# नवभारत

डिसेंबर २०१३



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६५ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारत' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारत' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे:

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६७। अंक ३। डिसेंबर २०१३
कार्तिक/मार्गशीर्ष शके १९३५
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका

# नवभारत

## डिसेंबर २०१३

## अनुक्रमणिका

---

# धनगरांचे हालुमत पुराण

विश्वनाथ शिंदे

भारतात पुराणनिर्मितीची एक समृद्ध परंपरा होती, सुत-मागध इत्यादी जातींकडे पुराण सांगण्याचे काम होते. पुराणे कोणी व कशी निर्माण केली, हे सप्रमाण सांगणे आज शक्य नाही; पण असे असले तरी लोकजीवनात वेगवेगळ्या प्रकारची मिथके रूढ होती, त्या मिथकांना मौखिक कथांचे–कथागीतांचे रूप देण्याचा प्रयत्न झाला आणि त्यातूनच पुराणांची निर्मिती झाली. पुढे या पुराणांचे संकलन-संपादन करण्याचे काम जाणकार ऋषिमुनींनी केले आणि पुराणनिर्मितीची एक समृद्ध परंपरा अस्तित्वात आली. या संदर्भात प्रभाकर मांडे लिहितात, 'लोकपंरपरेमध्ये प्रचलित असलेल्या मौखिक कथागाथांच्या व चरित्रांच्या आधारे पुराणे सिद्ध झाली. भविष्यपुराणापर्यंतची १८ पुराणे प्रसिद्ध आहेत. या सर्वांचे कर्तृत्व व्यासांनाच बहाल करण्यात आले. असे असले तरी लोकपंरपरेत मौखिक स्वरूपात स्वतंत्रपणे काही कथा प्रचलित राहिल्या व अजूनही आहेत. त्या कथांची परंपरेनेच बांधणी झाली आणि त्यातून पुराणे निर्माण झाली व मौखिक परंपरेने प्रचलित राहिली.' (मांडे प्रभाकर, २०११, ३०४).

सृष्टीच्या निर्मितीचे रहस्य उलगडून सांगणे, सृष्टीच्या विनाशाची कारणमीमांसा करणे, एखाद्या राजकुलाची प्राचीनता स्पष्ट करणे, स्थानमाहात्म्य विशद करून सांगणे, क्षेत्राचे माहात्म्य सांगणे, एखाद्या दैवताचे चरित्रमाहात्म्य वर्णन करणे. राजा किंवा त्याच्या वंशातील महापुरुषांचे चित्रण करणे अशा विविध प्रकारच्या प्रेरणा पुराणनिर्मितीमागे असलेल्या दिसतात.

**विविध जातिपुराणे :**

ज्यांना आपण अठरा पुराणे असे संबोधतो, त्यांपेक्षा अगदी वेगळी पण पुराणपरंपरेशी नाते सांगणारी अनेक जातिपुराणे निर्माण झालेली दिसतात. ही जातिपुराणे अनंतकाळ मौखिक स्वरूपात एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे चालत आलेली आहेत. समाजात रूढ असणाऱ्या कथा-दंतकथांना आपल्या जातिवैशिष्ट्यांची जोड देऊन कुणीतरी ती निर्माण केली. कथेला नीटनेटके आकर्षक स्वरूप देऊंन, त्यात अद्‌भुताचे रंग भरून, चमत्कृतिपूर्ण घटना–प्रसंगांची भर घालून, लौकिकास अलौकिकतेचे स्वरूप देऊन लोकमानसाच्या आशाआकांक्षांना बळकटी देऊन पुराणांची निर्मिती केली. निर्मात्याने पुराणांती नाममुद्राही घातलेली दिसते.

'साळीमाहात्म्यसार' हे पद्‌मशाली साळी जातीचे पुराण, कासार जातीचे 'कालिकापुराण', गुरव समाजाचे 'देवलकमाहात्म्य', डक्कलवारांचे 'बसवपुराण', नाभिक जातीचे 'नाभिक पुराण नाभि-पुराण' अशी अनेक जातिपुराणे उपलब्ध असलेली दिसतात. आणि या पुराणांचे अत्यंत श्रद्धापूर्वक पठणही त्या त्या जातीतील लोक करतात किंवा अन्य कुणाकडूनतरी श्रद्धेने वाचन करून घेतात. याच परंपरेतील कुरूब धनगर जातीचे 'हालुमत पुराण' माझ्या हाती लागले. कन्नड भाषेत वेगवेगळी हालुमत पुराणे उपलब्ध आहेत, त्यांपैकीच हे एक असावे. पण मला उपलब्ध झालेले हालुमत पुराण मराठी भाषेत असून या पुराणाचे नाव 'महालिंगरायाचे हालुमत पुराण' असे आहे. धनगर समाजाच्या ज्या वेगवेगळ्या कुलदेवता आहेत, त्यांपैकी 'महिमांतक महालिंगराया' या नावाचे त्यांचे एक दैवत आहे. या महालिंगरायाने हुलजंती, ता. मंगळवेढा, जि. सोलापूर येथे आपले अवतारकार्य संपविले. त्या ठिकाणी त्यांची समाधी बांधण्यात आली; समाधीचे रूपांतर भव्य मंदिरात झाले. महालिंगराया हे कुरूब धनगर जातीतील एक योगिपुरुष होते. त्यांनी केलेले कार्य आणि त्यांचे अलौकिक व्यक्तिमत्त्व पाहून कुरूब धनगरांनी त्यांना कुलदैवताची प्रतिष्ठा दिली आणि त्यांचे चरित्र्यमाहात्म्य सांगण्यासाठी पुराण रचले. त्या पुराणाचा विचार पुढे विस्ताराने केला आहे.








**'हालुमत' संज्ञेचा अर्थ :**

कर्नाटकात-महाराष्ट्रात हाटकार किंवा कुरूब-धनगर जातीचे लोक आहेत, त्यांना 'हालमतदवरू' असे म्हणण्याची प्रथा आहे. कन्नड भाषेतील 'हालु' या शब्दाचा अर्थ दूध असा होतो. त्यामुळे दुधावर ज्यांची उपजीविका चालते ते लोक. या लोकांनी जी परंपरा निर्माण केली, त्यातून कुरूबसंस्कृती आकाराला आली. ती हालुमत. हालुमतपरंपरा प्रमाण मानून जगणारा, हालुमतांचा उद्धार करणारा, अत्यंत शुद्ध अंतःकरणाने निष्ठापूर्वक भक्ती करून परमेश्वराची प्राप्ती करून घेणारा, स्वतः दुःख-कष्ट भोगतो, सर्व सृष्टी एका परमेश्वराचा अंश आहे, असे समजून सर्वांशी समभावाने वागतो आणि लोकांना उपदेश करून इष्ट मार्ग दाखवितो तो हालुमत, असे प्रस्तुत पुराणात सांगितले आहे. धनगरव्यक्ती आणि समाज या उभय अर्थांनी हालुमत शब्द वापरला जातो. त्याबरोबर व्यक्ती आणि समूहाने निर्माण केलेली संस्कृती म्हणजेदेखील हालुमत, अशा आशयाची विधाने प्रस्तुत पुराणात आहेत.

'हालुमत' म्हणजे कोण, यासंबंधी एक स्पष्टीकरण-कथा प्रचलित आहे – एकदा शंकर-पार्वती आपापसात बोलत बसले होते. तेव्हा पार्वती शंकराला म्हणाली, 'माझ्या पहिल्या दोन्ही मुलांनी माझे दूध न पिल्यामुळे मला दुधाचा त्रास होत आहे.' त्यावर उपाय म्हणून शंकराने पार्वतीला स्तनातील दूध जमिनीवर पिळण्यास सांगितले. भिजलेल्या मातीपासून शंकराने एक स्त्री आणि एक पुरुष तयार केला. या कामात त्यास ब्रह्मा आणि विष्णूनेही मदत केली. ब्रह्म्याने त्या मृण्मय मूर्तींमध्ये प्राण घातला; आणि विष्णूने त्यांना पुनरोत्पादनाची शक्ती दिली. या स्त्री-पुरुषांपासून पुढे अनेक कुरूब-धनगर लोकांचा जन्म झाला. हे कुरूब-धनगर लोक सांगतात, की पार्वतीचे दूध प्याल्याने आम्हांस वरदान प्राप्त झाले आहे, त्यामुळे आम्ही स्वतःला 'हालुमतादरू' असे नाव ठेवून घेतले (रामकृष्णा-नागेगौडा, १९९८, १५३). पार्वतीच्या दुधावर ज्यांचे पालनपोषण झाले ते 'हालुमत', असे या कथेद्वारे स्पष्ट होते.

प्रत्येक जातीत अशा कथा रूढ असतात. आपल्या जातीची प्राचीनता स्पष्ट करण्याचा त्यांमागे हेतू असतो. त्यानुसार धनगर आपली उत्पत्ती पार्वतीपासून झाली असे सांगतात. तसेच धनगर शिवोपासक, मातृसत्ताक परंपरेतील द्रविडियन वंशाचे आहेत, याचे स्पष्टीकरणही ही कथा देते. प्राचीन काळी दूध हेच त्यांच्या उपजीविकेचे साधन होते, उदरभरणाचे मुख्य अन्न दूध होते. दुधावर पोसलेला आपला वंश आहे, असे हालुमतांना वाटते. दुधावर जगणाऱ्यांची एक विशिष्ट जीवनसरणी असेल. त्या जीवनसरणीलादेखील 'हालुमत' असे म्हटले आहे.

**कर्नाटकातील 'हालुमत' परंपरा :**

'हालुमत' परंपरेविषयी महाराष्ट्रात लेखन झालेले नसल्याने महाराष्ट्रीय लोकांना 'हालुमत' ही संज्ञा माहीत नाही. डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या 'विठ्ठल : एक महासमन्वय' आणि शं. बा. जोशी यांच्या 'मऱ्हाटी संस्कृती' या ग्रंथात हालुमत चरित्राचे केवळ निर्देश आलेले आहेत. ह्या नोंदी वगळता मराठीत 'हालुमत'संबंधी लेखन झालेले नाही. त्यामुळे मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना हालुमत चरित्र माहीत नाही. महाराष्ट्रातील जनतेला हालुमत परंपरेची माहिती नसली, तरी महाराष्ट्रातील सर्व कुरूब-धनगर लोक स्वतः 'हालुमत' असल्याचे स्वाभिमानाने सांगतात. दक्षिणेत आंध्र-कर्नाटकात 'हालुमत' संप्रदाय प्रसिद्ध आहे. या संप्रदायाविषयी विपुल अभ्यास तिकडे झालेला आढळतो. या संप्रदायाविषयी विपुल माहिती कर्नाटकात संकलित केलेली आढळते. कर्नाटकातील हंपी येथील विद्यापीठात स्वतंत्रपणे हालुमत अध्यासनाची स्थापना केलेली असून या हालुमत अध्ययनपीठाचे संचालक म्हणून डॉ. एफ. टी. हळ्ळेकेरी काम करीत आहेत. एकूण आठ हालुमतपुराणांची उपलब्धी आजपर्यंत कर्नाटकात झालेली आहे. या आठही हालुमत पुराणांचा परिचय करून देणारी पुस्तिका बेळगाव येथे राहणाऱ्या या विषयाच्या मान्यवर अभ्यासक डॉ. ज्योती होसूर यांनी प्रकाशित केली आहे. आता कर्नाटकात उपलब्ध असणाऱ्या हालुमतपुराणांची क्रमाने माहिती घेऊ.

१) हे हालुमतपुराण बसवण्णाप्पा नीलप्पा हळवळ्ळी बंकापूर यांनी प्रसिद्ध केले असून हे मौखिक परंपरेने चालत आलेले पुराण सांगत्य छंदात रचले आहे. इ. स. १९१० मध्ये या पुराणग्रंथाची पहिली लिखित आवृत्ती प्रकाशित झाली असून इ. स. १९९२ मध्ये या ग्रंथाची

अनुक्रमणिका

दुसरी लिखित आवृत्ती निघालेली आहे.

२) हालुमतोतेजक पुराण :

५०० वर्षांपूर्वीच्या ताडपत्रावर लिहिलेल्या पुराण-ग्रंथाची ही मुद्रित आवृत्ती आहे. भीमकवी शंकरदास रस्तापुरा यांनी ती प्रकाशित केली आहे. हा ग्रंथ छटपदी छंदात असून तो पद्यग्रंथ आहे. या ग्रंथाचे पहिले मुद्रण इ. स. १९१६ मध्ये झाले, तर या ग्रंथाची दुसरी आवृत्ती इ. स. १९८२ मध्ये प्रसिद्ध झाली.

३) हालुमतद् पुराणवु :

ह्या मौखिक पुराणाची रचना पद्य स्वरूपाची असून पुराणामध्ये सांगत्य छंदाचा वापर केला आहे. ताडपत्रावर लिहिलेल्या प्रतीवरून या ग्रंथाचे प्रकाशन कवी चन्नबसवा दावणगेरे यांनी केले आहे. या पुराणाचे प्रथममुद्रण इ. स. १९५९ मध्ये करण्यात आले.

४) सिद्धबिरेश्वरा अर्थात श्री करिसिद्धेश्वर (हालुमत) पुराण :

हे पुराण सोप्या गद्य भाषेत रचलेले असून ही कथा श्री. अप्पण्णा पुजारी यांनी निवेदित केली आणि श्री. अण्णप्पा वासुदेवराया मुत्तुरा यांनी त्याची रचना केली आहे. या ग्रंथाचे प्रकाशन इ. स. १९७१ मध्ये झाले आहे.

५) सुक्षेत्र हुलजंती महालिंगरायर हालुमत पुराण :

या पुराणाची पुनः रचना महालिंगरायाचे २० व्या पिढीचे वंशज श्री. अडिव्यप्पा माळप्पा सोमुत्ते (ओडियार) यांनी केली आहे. मुळातील पद्यस्वरूपातील पुराणाचे हे गद्यरूप पुराण आहे. ग्रंथाची भाषा सोपी आहे. अनेक ठिकाणी भाषेची अशुद्ध रूपे दिसतात. प्रस्तुत पुराण इ. स. १९९३ मध्ये प्रसिद्ध झाले आहे.

अडिव्यप्पा माळप्पा सोमुत्ते (ओडियार) हे महालिंगरायाचे चरित्र पद्यरूपातही गात असतात. महालिंगरायाचे चरित्र 'अडिव्यप्पा ओडियारू हाडिद् महालिंगरायन् काव्य' या नावाने प्रकाशित झाले आहे. या काव्याचे संपादन श्री. गंगाधर दैवेज्ञ यांनी इ. स. १९९९ मध्ये केले. या काव्याचे प्रकाशन हंपी कन्नड विश्वविद्यालयाने केले आहे. 'डोळ्ळीन हाडगळु रूपदल्ली इरव महीलिंगरायन कथेवन्न संग्रहिसिलागीदे' म्हणजे ढोलकैताळावर म्हटली जाणारी पद्यरूप महालिंगरायाची चरित्रकथा संग्रहरूपाने प्रसिद्ध केली आहे. प्रस्तुत संग्रहात महालिंगरायाचे चरित्र क्रमाने येत नाही. म्हणजे चरित्रकथा मागेपुढे झाली आहे. उपलब्ध झाली तशी ही गाणी प्रकाशित केली आहेत.

६) जानपद हालुमत महाकाव्य :

प्रस्तुत काव्य म्हणजे सिद्धप्पा मेट्टी यांनी गायलेली, मौखिक परंपरेने चालत आलेली धनगरी ओवीगीते आहेत. त्यामधून श्री. महालिंगराया या दैवताचे चरित्रचित्रण केलें आहे. कर्नाटक विश्वविद्यालय, गुलबर्गा येथील कन्नड भाषेचे प्राध्यापक डॉ. वीरण्णा दंडे यांनी हे महाकाव्य संग्रहित करून प्रकाशित केले आहे. या ग्रंथाचे प्रथम-प्रकाशन इ. स. २००० मध्ये करण्यात आले.

७) तगर पवाड :

ही हस्तलिखित स्वरूपात उपलब्ध झालेली पोथी आहे. ८ संधी (अध्याय) आणि ६३८ पद्यरचना असलेला हा ग्रंथ अप्रकाशित आहे. या हस्तलिखित प्रतीमध्ये महालिंगरायाचे चरित्र असून 'मार्गद हाडुगळू' (तत्त्वविचारांची गाणी) असणारा स्वतंत्र विभाग त्यात आहे. 'प्रबुद्ध कर्नाटक' या म्हैसूर विद्यापीठाच्या पत्रिकेत या हस्तलिखित पोथीमधील कथेचा सारांश इ. स. १९६२ मध्ये प्रकाशित झाला. श्री. सी. के. परशुरामय्या यांनी तो प्रकाशित केला आहे.

**कन्नड 'हालुमत' पुराणातील कथासूत्र :**

कुरूब-धनगर समाजातील कर्तृत्ववान परमेश्वराची मनोभावे भक्ती करणारे, समाजाला सन्मार्ग दाखवून त्यांचा उद्धार करणारे आणि स्वतः मोक्ष संपादन करून लिंगैवय झालेले महापुरुष कुरूब-धनगरांचे आदराचे विषय झाले. त्या ऐतिहासिक महापुरुषांना कुरूब-धनगरांनी देवपण दिले; आपला आदिदेव, कुलदेव मानले. गोल्लगेरेचा गोल्लाळा, हुलजंतीचा म्हाळप्पा-महालिंगराया आणि पट्टणकडोलीचा इट्टप्पा-विठ्ठल या तीन महापुरुषांचे चरित्र हालुमत पुराणात सांगितले आहे. या तीनही महापुरुषांना देवतास्वरूप प्राप्त करून देणारी प्रेरणा म्हणजे बिरप्पा. हे लोकदैवत असल्याने या पुराणांमध्ये बिरप्पा या देवाचे चरित्रमाहात्म्य सांगितले आहे.

**हुलजंती महालिंगराया :**

"उपार जनाआकर्षणेय विशिष्ट शक्तिगळन्नु पडसिद्ध










सिद्धीपुरुषअंबुद वीरधीव्यंबुदू विदितकागुत दे" (लक्षावधी भक्तांचे आकर्षण असलेली, विशिष्ट योगशक्ती सामर्थ्य लाभलेला सिद्धपुरुष आणि वीरपुरुष म्हणून लौकिक प्राप्त झालेला) अशा शब्दांत कन्नड भाषेत ज्यांचा गौरवपूर्ण उल्लेख केलेला आहे, त्या देवाचे नाव आहे महालिंगराया-म्हाळप्पा. महालिंगरायाने हुलजंती, ता. मंगळवेढा, जि. सोलापूर येथे सुमारे पाचशे वर्षांपूर्वी आपले अवतारकार्य संपविले. आपल्या कार्यकर्तृत्वाने जनमानसावर अमीट ठसा उमटविला, भक्ती आणि योग्यसामर्थ्यावर भक्तांना चकित करून नावलौकिक प्राप्त केला. असे हे महालिंगराया इतिहासातील एक महापुरुष होते. प्रस्तुत 'महिमांतक महालिंगरायाचे हालुमतपुराण' त्याच्याच चरित्रचित्रणावर आधारलेले असल्याने पुढे विस्तारपूर्वक या संदर्भातील विवेचन येणार आहे, त्यामुळे येथे अगदी थोडक्यात त्यांची ओळख करून द्यावयाची आहे.

बिलवाडपूर (शिखर शिंगणापूर) बारामतीच्या करीगौडास तुक्कप्पराया आणि सोमराया नावाची दोन मुले होती. त्यांपैकी तुक्कप्परायाच्या पोटी माळिंगराया यांचा जन्म झाला. माळिंगरायास जक्कप्पराया नावाचा एक भाऊ होता. माळिंगरायास रब्बेराया, बीरमुत्या, कणमुत्या, सोमराया या नावाची चार मुले झाली. उपरोक्त माळिंगराया म्हणजेच हुलजंती महालिंगराया होय. महालिंगरायाचा नातू बरगालसिद्ध हादेखील सिद्धपुरुष होता. त्यासही पुढे देवतारूप प्राप्त झाले. आज महालिंगरायाच्या २० व्या पिढीचे प्रतिनिधी म्हणून अडिव्यप्पा माळप्पा सामुत्ते (ओडियार) हुलजंती येथे आहेत. त्यांनी 'सुक्षेत्र हुलजंती महालिंगरायर हालुमत पुराण' हा ग्रंथ लिहिला असून तो १९९३ मध्ये प्रकाशित झाला आहे, या गोष्टीचा निर्देश याआधी आला आहे. तसेच ढोलावर म्हणावयाची गाणी त्यांनी रचली असून त्यातही महालिंगरायाचे चरित्रवर्णन आहे. त्याचे प्रकाशन इ. स. १९९९ मध्ये झाले. ह्या रचना कन्नड भाषेत आहेत.

ज्या अर्थी अडिव्यप्पा माळप्पा सोमुत्ते (ओडियार) हे महालिंगरायाचे २० व्या पिढीचे वंशज आहेत, त्या अर्थी सुमारे ५०० वर्षांपूर्वी महालिंगराया होऊन गेले असावेत, हे स्पष्ट होते. १४-१५ वे शतक हा महालिंगरायांचा कालखंड ठरतो. कन्नड जनजीवनात महालिंगराया हे बसवेश्वराचे अवतार आहेत, अशी धारणा आहे. १४ व्या शतकातील भीमकवीने कन्नड भाषेत बसवपुराण रचले आणि या बसवपुराणात महालिंगराया हे बसवचा अवतार आहेत असे सांगितले आहे. याचा अर्थ महालिंगराया बसवेश्वरांनंतर होऊन गेले, याबद्दल शंका राहत नाही. कुरूब-धनगर जातीत जन्मलेला महालिंगराया ह्या महापुरुषाला थोड्याच अवधीत दैवतस्वरूप प्राप्त झाले आणि ते कुरूब-धनगरांचे कुलदैवरू-मनेदेवरू झाले. पुढे हाच कुलदेव सर्व कुरूब-धनगरांचा आदिदेव-समाजदेव म्हणून मान्यता पावला.

आज हुलजंती येथे महालिंगरायाची आश्विन महिन्यात दिवाळीच्या वेळी पाच दिवस मोठी यात्रा भरते. आंध्र, कर्नाटक आणि महाराष्ट्रातील लाखो भक्त यात्रेत सहभागी होत असतात. पंढरपूरच्या विठ्ठलाची आणि महालिंगरायाची भेट झाल्याचा संदर्भ पुराणात आलेला असला, तरी ती पुराणकथा आहे. त्याचप्रमाणे बिरोबा महालिंगरायाचा गुरू होता असा हालुमतपुराणात आलेला संदर्भ ही आपल्या आराध्यदैवताचे माहात्म्य वाढविण्यासाठी सांगितलेली कथा आहे, असेच म्हणावे लागेल. हुलजंतीच्या यात्रेत अरकेरी (जि. विजापूर) येथील अमोगसिद्ध, हुन्नूर, ता. मंगळवेढा येथील बिरप्पा, सोनारी (ता. परंडा, जि. उस्मानाबाद) येथील सोनारसिद्ध, चिंचली (ता.रायबाग, जि. बेळगाव) येथील मायक्का, पट्टणकडोली (जि. कोल्हापूर) येथील विठ्ठल बिरप्पा अशा वेगवेगळ्या तीर्थस्थानांतून पालख्या येतात आणि पालख्यांच्या भेटी होतात. यावरून महालिंगरायाचे प्रभावक्षेत्र सर्वदूर पसरल्याचे दिसते. हुलजंतीची भाकणूक (भविष्यवाणी) अत्यंत प्रसिद्ध आहे. अनेक भक्त नवस फेडण्यासाठीदेखील हुलजंतीस येतात. भाकणूक होण्याच्या आदल्या रात्री महालिंगेश्वर आणि इतर देवतांच्या मंदिराच्या शिखरांवर सुमारे शंभर मीटर लांबीचा फेटा बांधला जातो. फेट्यास 'ध्वज' अशी संज्ञा रूढ आहे. या फेट्यासाठी वापरलेले सूत, त्याचे विणकाम, त्यातील जाडेभरडेपणा, त्याचा पोत इत्यादी गोष्टींच्या आधारे भाकणूक केली जाते. प्रत्यक्ष परमेश्वर कैलासातून येऊन मंदिराच्या

शिखरांना ध्वज बांधतो, अशी येथील भाविकांची श्रद्धा आहे.

**पट्टणकडोलीचा विठ्ठल-बिरदेव :**

कोल्हापूर जिल्ह्यातील हातकणंगले तालुक्यात पट्टणकडोली या नावाचे गाव आहे. धनगरांच्या पारंपरिक ओवीगीतांत या गावाचा इंगळकोडोली असा निर्देश आहे. या गावच्या 'तोरणमाळ' असे संबोधल्या जाणाऱ्या भागात विठ्ठल-बिरदेवाचे प्राचीन भव्य मंदिर आहे. मंदिराच्या आवारात चिंचेची विपुल झाडे असून त्या गर्द छायेत अनेक छोटीमोठी मंदिरे आहेत. गावातून मंदिराकडे जाताना उजव्या बाजूला धनगरांच्या पूर्वजांची अनेक स्मारके दिसतात. मंदिरात प्रवेश केल्यानंतर नवीन मंडप लागतो. तो ओलांडून जुन्या मंडपात गेल्यावर पुढे मंदिराचे गर्भगृह दिसते. दोन गर्भगृहांपैकी एकात बिरदेव आणि विठ्ठल यांच्या स्वयंभू पिंडी आहेत. त्यांपैकी मोठी पिंड बिरदेवाची आणि लहान पिंड विठ्ठलाची आहे. दुसरे गर्भगृह विठ्ठलाची कन्या भागूलेकीचे आहे. प्रतिवर्षी भोंबी पौर्णिमेनंतर म्हणजे आश्विन कोजागिरी पौर्णिमेनंतर मृग नक्षत्रावर तीन दिवस मोठी यात्रा भरते. यात्रेत जे विविध विधी केले जातात, त्यांमध्ये पहिला नैवेद्य दाखविण्याचा मान कर्नाटकातील हेग्गडे, बंती घराण्याचा आहे. यात्रेत वालग, ढोलावरील ओवीगीते सादर केली जातात. सोलापूर जिल्ह्यातील माढा तालुक्यातील अंजनगाव येथील फरांडेबाबाच्या भाकणुकीचा कार्यक्रम यात्रेत असतो.

बिरोबा किंवा बिरदेव हा बावन्न घीरांचे तत्त्व एकत्र घेऊन जन्माला आलेला देव. सुरवंतीच्या पोटी शिवकृपेने बिनपापादोषाचा, सूर्याचे तेज असलेला, बिनपुरुषाचा असा जन्मलेला बिरदेव. तो अयोनिज आहे.

असा बाळ जन्मला। पायामधी पद्म।
मुखामधी रतन। बोंबीमध्य हिरा।
कपाळी दिसे चंद्र। जणू स्वर्गीचा तो इंद्र।
रूपाने सावळा। केसाचा कुरळा।
नवतीचा कवळा। झाला भंडाऱ्याने पिवळा।
नव्हे पापादोसाचा। सुरवंतीच्या कुसीचा।

अशा रूपाचा बाळ सुरवंतीच्या पोटी जन्मला.

पट्टणकडोलीला येण्यापूर्वी बिरप्पा वर्णे (वारणा) नदीच्या एका वारुळात १२ वर्षे सर्परूपाने राहिला. बारा वर्षे विठ्ठलाने त्याची मेंढरे राखली. नियमितपणे दूध पाजून विठ्ठलाने त्याचा सांभाळ केला. अखेरीस विठ्ठलाच्या भक्तीवर प्रसन्न होऊन बिरप्पा वारुळातून बाहेर आला आणि विठ्ठलास त्याने आपला भाऊ मानले. म्हणून विठ्ठल-बिरप्पा एकत्र नांदतात, अशी कथा धनगरांच्या लोकगीतात आली आहे. विठ्ठल आणि बिरप्पा हे दोघेही मुऱ्यप्पाचे शिष्य आहेत. त्यामुळे विठ्ठल-बिरप्पाबरोबरच पट्टण-कडोलीच्या गाभाऱ्यात मुऱ्याप्पाचेही वास्तव्य आहे.

**कुरूब-धनगरांची परंपरा -**

आंध्र-कर्नाटक-महाराष्ट्र या राज्यांत कुरूब-धनगर समाजातील लोक मोठ्या प्रमाणात आढळतात. आंध्रप्रदेशात त्यांना कुर्मा किंवा कुरूमा म्हणतात, कर्नाटकात त्यांना कुरूब असे संबोधले जाते, तर महाराष्ट्रात धनगर या नावाने त्यांना ओळखतात. इतर राज्यांतही हे लोक काही प्रमाणात आढळतात. गडेरिया, ओरान, धांदर, धागर, पटेलिया अशा विविध नावांनी धनगरांना संबोधले जाते. कर्नाटक ही धनगरांची मूळ जन्मभूमी समजली जाते. कर्नाटक राज्याच्या खालोखाल महाराष्ट्रात धनगरांची लोकसंख्या अधिक आहे. महाराष्ट्रातला तो सर्वाधिक मोठा मेंढपाळ जनसमूह आहे. साधारणपणे मेंढ्या पाळणे हा त्यांचा पारंपरिक व्यवसाय असून मेंढ्या पाळणाऱ्यांना हाटकर धनगर असे संबोधले जाते. धनगरांमधील काही लोक मेंढ्यांच्या लोकरीपासून घोंगडी विणतात, जेन तयार करतात. अशांना 'सणगर' असे संबोधले जात असे.

कर्नाटक महाराष्ट्र संस्कृतीचे प्रख्यात अभ्यासक शं. बा. जोशी यांनी मानव विकासक्रमाच्या सामान्यपणे चार अवस्था असल्याचे सांगून त्यांची विभागणी खालीलप्रमाणे केली आहे–

१. आहारसंचयार्थ भटकणाऱ्या पारध्याची. २. पाळीव जनावरांची माहिती झाल्यावर उदयास आलेल्या धनगरांची. ३. वृक्ष-वनस्पतींची ओळख झाल्यावर त्यांची लागवड करण्यास आरंभ करणाऱ्या शेतकऱ्यांच्या कुटुंबीयांची. ४. शेतीपुढील क्रमप्राप्त व्यापारउद्योग व धंदेवाईक. (जोशी : वर्ष नाही : ३३).

धनगरलोक जंगलात फिरत, तेथेच वास्तव्य करीत, जंगलासाठी 'हट्टी' असा कन्नड भाषेत शब्द आहे. त्यामुळे जंगलात राहणाऱ्यांना हटकर किंवा हाटकर अशी संज्ञा मिळाली. 'हाटकर-धनगर' हे पद एकाच अर्थाचे दोन शब्द मिळून झाले आहे (Translation Compounds) हटकर म्हणजेच धनगर. 'धन' म्हणजे संपत्ती. गाईगुरांची संपत्ती म्हणजे गोधन. त्यामुळे गोधन सांभाळून राहणारा तो धनगर किंवा दनगार. कन्नड भाषेत गाईगुरांना 'दना' असे ग्रामीण बोलीत म्हणतात. तोही अर्थ येथे सुसंगत ठरतो. गुराखी दिवाळीच्या सणात गाईगुरांना ओवाळताना 'दन दन दिवाळी गाई म्हशी ओवाळी' अशी गाणी गातात. या गाण्यात 'दन' हा शब्द संपत्ती याच अर्थाने आलेला दिसतो. थोडक्यात, दनगर किंवा धनगर म्हणजे गोपालक किंवा पशुपालक समाज होय.

मूळच्या महाराष्ट्रातील धनगरांना मराठी धनगर म्हणतात, तर इतर राज्यांतून येऊन महाराष्ट्रात स्थायिक झालेल्यांना परदेशी धनगर संबोधतात. हटेकर, खुटेकर, हातीकाकणे, सनगर, शेगर, आहेर, सोलाट, परदेशी, खिल्लारी, बनगर, बंडेधनगर, गंडेधनगर अशा एकूण साडेबारा जाती धनगरांमध्ये आहेत (बाळासाहेब बळे : १९८९ : ३). पण यांपैकी काही आडनावे आहेत, तर काही उपजाती आहेत, हे आपल्या लक्षात येते.

अंगात बाराबंदी, कमरेला तिकोनी लंगोट, डोक्याला गडद रंगाचे पागोटे, खांद्यावर घोंगडी, कानात सोन्याची बाळी, मनगटात रुप्याचे जाड कडे, हातात पुरुषभर उंचीची काठी, पायात जाड शिंगाडी जोडा असा धनगरी पुरुषाचा पोशाख असतो. तर जाड काठाचे धारवाडी मोठाचे नऊवारी लुगडे, अंगात खणाची चोळी, हातात रुप्याचे गोठ, कानात कुडके, पायात जोडवे, चांदीचे जाड तोडे, नाकात गोल नथ आणि कपाळावर आडवे मळवट भरलेले कुंकू असा धनगरी स्त्री-पुरुषांचा वैशिष्ट्यपूर्ण पोशाख असतो.

घोड्यावर संसाराचे साहित्य लादून धनगर मेंढ्यांना बरोबर घेऊन चारा मिळेल तिकडे भटकत असतात. कोकणाकडे त्यांचा ओढा अधिक असतो. साधारणपणे दिवाळीनंतर ते बाहेर पडतात आणि पावसाळ्याच्या सुरुवातीला ते आपापल्या गावी परत येतात. रानात जिथे मेंढरे बसवलेली असतात, तेथे रात्रीच्या वेळी आपल्या कुलदेवतांचे स्मरण करताना ओव्या म्हणतात. ढोल, कैताळ, झांज, पावा इत्यादी वाद्यांच्या संगतीने रात्ररात्रभर धनगर ओव्या गातात. मेंढरांची राखण आणि देवांचे स्मरण या दोन्ही गोष्टी त्यातून घडतात. ओवीगायनाच्या आरंभी सूर्य, चंद्र, भूमी, नद्या आणि कुलदैवतांना नमन केले जाते.

**धनगरांच्या देवदेवता :**

बिरोबा, खंडोबा, धुळोबा, मस्कोबा, शिंगरोबा, महालिंगराया, अमोकसिद्ध, बरगालसिद्ध, करसिद्ध, बाबीरबुवा, सुरवंती, मायक्का, कामाई इत्यादी धनगरांच्या देवता आहेत. ते त्यांना कुलदेवता मानतात. कन्नड भाषेत 'कुलदेवरू', 'मनेदेवरू' असे म्हणतात. यांपैकी बहुतेक सर्व देव धनगरसमाजातील महापुरुष आहेत. ते धनगरांचे पूर्वजपुरुष आहेत, ही बाब येथे आवर्जून ध्यानात घेतली पाहिजे. मृत व्यक्तींच्या नावाने घराच्या देव्हाऱ्यात 'भाक' बांधून ठेवायची आणि एखाद्या शुभमुहूर्तावर भाक बांधून ठेवलेल्या व्यक्तीच्या नावाने 'टाक' तयार करून त्याची पूजा करायची, ही प्रथा अनेक जातींमध्ये आढळते. पूर्वजपूजेच्या प्रथेतून धनगरांच्या देवदेवता निर्माण झाल्या आहेत. त्यांच्या कुलदैवता काल्पनिक किंवा अलौकिक स्वरूपाच्या नाहीत. सूर्य, चंद्र, पृथ्वी, नदी ह्या त्यांच्या कुलदेवता नाहीत; त्या उपास्यदेवता आहेत. निसर्गातील त्या उपकारक शक्ती आहेत. त्यामुळे त्यांचे केवळ स्मरण केले जाते. अर्थात लौकिक देवतांना कालक्रमात अलौकिक स्वरूप प्राप्त झाले आहे हे खरे. अगदी अलीकडील उदाहरण सांगायचे झाले तर कोल्हापूर जिल्ह्यात आदमापूर (मुदाळतिट्ठा–मुरगूड परिसर) येथे केवळ १००-१२५ वर्षांपूर्वीच्या धनगर महापुरुषाला 'बाळुमामा' दैवताचे रूप लाभले असून लक्षावधी भाविक बाळूमामाच्या यात्रा उत्सवात सहभागी होतात. या देवदेवतांसंबंधी धनगरांच्या विशिष्ट धारणा आहेत. या देवता शिवशंकराचे अवतार आहेत, असे त्यांना वाटते. त्यामुळे त्यांच्या देवतांच्या गळ्यात शिवलिंग घातलेले असते. विधिविधानांमध्ये, पूजाअर्चनेत भंडारा महत्त्वाचा मानला जात असला, तरी देवतांच्या कपाळाला विभूतिभस्म लावलेले असते.

त्यांच्या देवता नागरूप धारण करतात किंवा नागरूपाने वास करतात. त्रिशूल, डमरू या शंकराच्या वस्तू धनगरांच्या देवतांनी धारण केलेल्या दिसतात. गरडलिंबाची फुले, तरवडाची फुले यांबरोबरच सदाफुलीही देवतांना वाहिली जाते. मल्लिकार्जुन, हाटकेश्वर, सिद्धेश्वर इत्यादी देवतांशी धनगरी देवतांचे सख्य असते. देवता वारुळात वास करतात, अशीही धनगरांची समजूत आहे. आपल्या देवतांनी कोणत्यातरी दैत्याचा नाश केला, असा कल्पनाबंध त्यांच्या दैवतांच्या चरित्रात आढळतो. नाथसंप्रदायातील सिद्धसंकल्पनेशी त्यांच्या दैवतांचा निकटचा संबंध असलेला दिसतो. योगाचार, पाशुपतमतातील जीवाचा पशुस्वभाव बीजाक्षर, देवतागणांचे चमत्कार, निष्ठूर अनुष्ठान, नरबळी, परमतत्त्व, शून्यसाधना, शिवशक्तीमीलन, सिद्धसाधना, त्यामधील यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधी या गोष्टींचे आचरण देवतांचे पुजारी किंवा भगत करीत असतात. असे असूनही धनगर वैदिक परंपरेतील नाहीत ही गोष्ट अगदी स्पष्ट आहे. "मुळात शैवपंथ वैदिक असणे शक्य आहे, असे कोणी म्हणू शकतील; पण शिव हा शब्द मूळात संस्कृत नसून आर्येतर-द्राविडवर्गीय भाषेतून आला आहे. याकरिता शिवदेवता आणि शैवपंथ हा वैदिक मार्गाहून निराळा आहे, असे म्हणणे जरूर वाटते. वेदांत रुद्राचे आणि पुराणांतून शिवाचे वर्णन वाचले असता तो आर्यपक्षपाती आहे, असे धैर्याने सांगणे शक्य नाही." (शं. बा. जोशी : साल उल्लेख नाही : १०६). बसवेश्वरानंतर वीरशैव लिंगायत धर्माचा स्वीकार धनगरांनी केला. त्यामुळे लिंगायतांच्या अनेक परंपरा धनगरांच्या आचारधर्मात आणि देवदेवतांच्या पूजेअर्चनेत आढळतात.

**धनगरांचे यात्राउत्सव :**

महाराष्ट्रीय जनतेप्रमाणे सर्व सण धनगर साजरे करतात; पण त्यांच्या संस्कृतीचा खरा आविष्कार त्यांच्या देवदेवतांच्या यात्रा-जत्रा-उत्सवांतून झालेला दिसतो. कुलदैवतांच्या यात्रा-उत्सवांत घरातील सर्व लहानथोर व्यक्ती सहभागी होतात. आरेवाडी, फलटण, पट्टणकडोली, हुलजंती, अप्पाची वाडी, वाशी, हुन्नूर, करमाळा, सोनारी, खरसुंडी अशा महाराष्ट्रातील अनेक तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी त्यांच्या यात्रा भरतात. वावरजत्रा, देव ओवाळणी, नवस फेडणे, भावणूक (हुईक) असे अनेक प्रकारचे विधी यात्रेत केले जातात, अबदागिरीसह पालख्या काढल्या जातात. पालख्यांमध्ये देवदेवतांचे तांब्या-पितळेचे मुखवटे बसवून देवतांची मिरवणूक काढली जाते. मिरवणुकीत प्रचंड भंडारा उधळला जातो. पट्टणकडोलीस फलटणचा धुळोबा, अरकेरीचा आमोगसिद्ध, हुलजंतीचा हालिंगराया, हुन्नुरचा बिरप्पा यांच्या पालख्या यात्रेत भेटीसाठी येतात. वर्षभर मेंढरांचे कळप घेऊन फिरणारे धनगर जसे यात्रेत एकमेकांना भेटतात, त्याचप्रमाणे त्यांचे देवही एकमेकांना भेटतात. या यात्रा चैत्र आणि आश्विन महिन्यांत असतात. यात्रेत 'वालग', 'गज्जानृत्य' असे खेळ खेळले जातात. ढोल कैताळाच्या तालावर मंडळी ओव्या गातात, ओव्यांमधून देवदेवतांचे गुणगान करतात. वनगाईच्या केसांचा झुबका बांधलेल्या काठीसह मिरविल्या जातात.

**भावणूक किंवा हुईक :**

यात्रा-उत्सवांतील सर्वाधिक महत्त्वाचा विधी म्हणजे भाकणूक किंवा हुईक म्हणजे भविष्य वर्तविण्याचा विधी. भाकणूक सांगण्याचे काम भगत करीत असतो. त्याच्या अंगात देवाचा संचार होतो आणि तो भविष्य कथन करतो. भाकणुकीसाठी सांकेतिक भाषा असते.

ऐका हो ऐका नगरा हो–

नगराचं सगरं होत्याल, डोंगरी दिवे लागत्याल, झाडी पाळणे हालत्याल, पालखीत पेंढी मिरविल, शिंग सोन्याचं व्हईल, खुरं रुप्याचं व्हईल, अठरापगंड जात एका पंक्तीला जेवेल, लोक गेटावर जातील, दगडाच्या लाह्या व्हतील, बिनबैलाची गाडी येईल, तांबडतोंडे, लालबोंडे तीन शेंडे आपल्या दखनात येत्याल (मांडे : १९८५ : ३५)

असे भाकणुकीचे स्वरूप असते. भाषा नादमय, लयपूर्ण असते. शब्दांना सांकेतिक अर्थ असतो. पालखीत पेंढी मिरविली म्हणजे जनावराचा चारा दुर्मीळ होईल. शिंग सोन्याचे व्हईल म्हणजे जनावरे महाग होतील. ही सांकेतिक भाषा सरावाने समजते. भाषेचा अर्थ सांगणारे समाजात विशिष्ट लोक असतात. बाळासाहेब बळे यांनी असे शब्द आणि त्यांचे अर्थ त्यांच्या ग्रंथात दिले आहेत.

माणिकमोती-ज्वारी, वेणी-गहू, हिरवे पातळ-जवस, खालमानी-मेंढी, वरमानी-शेळी (बळे : १९८९ : २०).










हुईक सांगणाऱ्या भक्ताला काही नैतिक पथ्ये पाळावी लागतात.

यात्रेत लग्न जमविणे, तंटा मिटविणे अशा गोष्टी केल्या जातात. कधीकाळी धनगरांमध्ये जातपंचायत होती असे सांगितले जाते, पण आज तिचे अस्तित्व नाही. धनगरांमध्ये वेगवेगळ्या कुळ्या आहेत. सारख्या कुळात सोयरिक होत नाही. सूर्यफूल, कमळ, पाच पालवी ही त्यांची देवके (Totem) आहेत. लग्नाची एक विशिष्ट परंपरा धनगरांमध्ये अस्तित्वात आहे. लिंब नेसणे, दंडवत घालणे अशा प्रथा आहेत. डाक घालण्याची प्रथा धनगरांमध्ये काही भागात आहे. डाक घातल्यावर मंड्याचे जेवण घातले जाते. कुमारिकेच्या मृत्यूनंतर सवाष्ण स्त्रियांना भुणेजेवण घातले जाते.

**राज्यकर्ती जमात :**

धनगर ही राज्यकर्ती जमात होती. यादवांचे कूळ हे मुळात धनगरांचे होते, असे सांगितले जाते. विजयनगर साम्राज्याची मुहूर्तमेढ ज्या हक्कबुक्कांनी रोवली, त्या बंधूंपैकी हक्क यांनी राजपद प्राप्त केल्यानंतर आपल्या राजधानीत विठ्ठल-बिरप्पा या कुलदेवतांना उन्नत करून बिरप्पाचा शिवरूपी विरूपाक्ष करून त्यांचे मंदिर बांधले असे सांगितले जाते (ढेरे : २००५ : ३०५). म्हैसूरचे राजे ओडियार हे कुरूब-धनगर होते, अशीही एक धारणा आहे.

बळ्ळारी जिल्ह्याच्या हडगल्ली तालुक्यात तुंगभद्रा नदीकाठी मैलार नावाचे एक गाव आहे. कर्नाटकातील मैलार खंडोबाचे ते प्रख्यात ठाणे आहे. आदिमैलार असे त्यास म्हटले जाते. तेथील मंदिरात वारुळाच्या मातीपासून शेकडो वर्षांपूर्वी बनविलेली मैलार-खंडोबाची मूर्ती आहे. त्यामुळे त्यास मण्णुमैलार म्हणतात. त्या मंदिराचे विश्वस्त श्रीगुरू काडप्पय ओडियार यांना मी इ. स. २००९ च्या दिवाळी सुट्टीत खंडोबाच्या संशोधनासाठी गेलो असताना भेटलो. ते स्वतः कुरूब-धनगर आहेत. आपण म्हैसूरच्या ओडियारचे वंशज आहोत, असे त्यांनी मला सांगितले. हुलजंती, ता. मंगळवेढा येथील महालिंगरायाच्या २०व्या पिढीचे वंशज अडिव्यप्पा माळप्पा सोमुत्ते (ओडियार) हे धनगरच आहेत. त्यामुळे म्हैसूरच्या राजकुलाशी कुरूब-धनगरांचे नाते असावे, असे वाटते. महापराक्रमी मल्हारराव होळकर हे जेजुरीजवळील होळ मुरूमचे होते. त्यांची सून साध्वी अहिल्याबाई होळकर बीड जिल्ह्यातील 'चौंडी' या गावची होती. त्यांची राजधानी इंदूरजवळ महेश्वर येथे होती, हे सर्वज्ञात आहे. त्यामुळे धनगरांच्या राजकुळाची परंपरा स्पष्ट होते.

पण आर्यांचे हल्ले, मोगलांचे हल्ले, इंग्रजी राजवट, स्वकीयांचे हल्ले यांमुळे या जमातीला आता पराभूतांचे जिणे वाट्याला आले आहे. डोंगरदऱ्यांत, जंगलझाडीत, माळरानावर फिरत जगावे लागत आहे. अखंड भटकंती सुरू असताना काही लोक स्थिरावले, शेती करू लागले, वतनदारही झाले. समाजकारणात, राजकारणात गेले, आमदार झाले, मंत्रिपदेही भूषविली. गतवैभव प्राप्त करण्याची त्यांची धडपड सुरू आहे. पण सत्ता नेहमी मूठभरांच्याच हातांत असते, बाकीच्यांना सामान्य जीवन जगावे लागते. सामान्य जीवन जगत असतानाही आपली परंपरा आणि कुरूब-धनगरांची संस्कृती समृद्ध करण्याचे काम ते करीत आहेत.

**कुरूब-धनगरांचे मराठी हालुमत पुराण :**

याआधी सांगितल्याप्रमाणे कन्नड भाषेत एकूण आठ हालुमत पुराणे उपलब्ध झाली असून ती वेगवेगळ्या कवी-लेखकांनी रचली आहेत. सुमारे पाचशे वर्षांपूर्वी ताडपत्रावर लिहिलेल्या पोथीच्या आधाराने आपण ह्या पुराणांची रचना केली, असे निवेदन इ. स. १९१० मध्ये प्रकाशित करण्यात आलेल्या ग्रंथात बसवण्यप्पा नीलप्पा हळवल्ली यांनी केले आहे. तसेच भीमकवी शंकरदास रस्तापुरा यांनी हालुमत पुराणाची दुसरी एक मुद्रणप्रत इ. स. १९१६ मध्ये प्रकाशित केली असून या ग्रंथातील निवेदनामध्ये सुमारे पाचशे वर्षांपूर्वीच्या ताडपत्रावर लिहिलेल्या पोथीच्या आधाराने हा ग्रंथ प्रकाशित करीत असल्याचे म्हटले आहे. इतर सहा हालुमत पुराणे कालांतराने प्रकाशित झालेली दिसतात.

मला उपलब्ध झालेले पुराण मराठी भाषेत रचले असून ते हस्तलिखित स्वरूपात आहे. हे हस्तलिखित गद्यात आहे. 'महिमांतक महालिंगरायाचे हालुमत पुराण' असे या पुराणाचे नाव आहे. रचनाकार म्हणून या पुराणात कुणाचीही नाममुद्रा नाही. कन्नड भाषेत प्रसिद्ध झालेल्या हालुमत पुराणांमध्येही मुळ रचनाकाराचे नाव

नसावे; कारण संपादकांपैकी कुणीही मुळ रचनाकाराच्या नावाचा निर्देश केलेला नाही. मला उपलब्ध झालेले पुराण कदाचित कन्नड भाषेतील एखाद्या हालुमत पुराणाचा मराठी अनुवाद असण्याची शक्यता आहे. पण कन्नड भाषेतील नेमक्या कोणत्या हालुमत पुराणाचा हा अनुवाद असावा, हे समजत नाही.

'महिमांतक महालिंगरायाचे हालुमत पुराण' या हस्तलिखिताचे एकूण सत्तर अध्याय असून त्याला तीन परिशिष्टे आहेत. प्रत्येक अध्यायाची सुरुवात नमनाने होते.

श्री गणेशाय नमः
श्री सरस्वत्यै नमः
श्री गुरुभ्यो नमः
श्री बिरलिंगराय नमः

असे अध्यायारंभी येणाऱ्या नमनाचे स्वरूप आहे. पुराणाची भाषा अत्यंत साधी, सोपी आहे. भाषेवर कन्नडचा प्रभाव जाणवावा इतका आहे.

**पुराण ग्रंथातील कथेचा काळ :**

दोन वेळा या पुराणात काळाचा निर्देश आला आहे. पुराणकथेचा नायक महालिंगराया याच्या मृत्यूची कल्पना रचनाकाराला सहन झाली नसावी; त्यामुळे त्याचा पुनर्जन्म झाला असे सांगून मुलाचा जन्म बारामतीच्या लाल किल्ल्यात झाला. जन्म इ. स. १५८० व अंत १६७७ मध्ये झाला, अशी नोंद परिशिष्ट क्र. १ मध्ये आहे. याच परिशिष्टात म्हटले आहे की रेवप्पाराया-रेवणसिद्ध यांनी प्राण सोडला, त्या वेळी आकाशवाणी झाली, की आजपासून तुमचे नाव रेवणसिद्ध होईल. इसवी सन १५८० असा उल्लेख आहे. वस्तुतः प्राचीन ग्रंथाचा काळ सांगण्याची एक विशिष्ट पद्धती असते. शके, संवत्सर, तिथी, वार यांचा निर्देश केलेला असतो. पण पुराणात असा प्रकार आढळत नाही. त्यामुळे या कालोल्लेखाविषयी शंका वाटते. कदाचित अनुवादकाराने सरधोपटपणे कालनिर्देश केला असावा. अध्याय क्र. ४६, ४७, ४८, ४९ मध्ये दिल्लीच्या बहाद्दुरशहा बादशहाचा निर्देश आला आहे. महालिंगरायाचा चुलता सोमराया दिल्लीस जाऊन हळ्ळीहणमराया आणि बहाद्दुरशहा यांच्यातील भांडण मिटवतो, बादशहाला विविध चमत्कार दाखवून आपण महान योगी असल्याचे सिद्ध करतो, असा संदर्भ आलेला आहे. औरंगजेबचा मुलगा बहाद्दुरशहा याचा काळ

इ. स. १७०७ ते १७११ असा आहे. आणि शेवटचा बादशहा बहादूरशहा यांचा काळ इ. स. १८३७ ते १८५७ असा आहे. पुराणग्रंथात आलेला कालोल्लेख आणि या दोन्ही बादशहांचा काळ यांचा मेळ बसत नाही. पुराणात इतिहासातील व्यक्तींचा एवढा एकमेव उल्लेख आहे आणि तो कालविसंगत आहे. त्यामुळे पुराणातील ही घटना केवळ काल्पनिक असण्याची शक्यता नाकारता येत नाही. पण प्रश्न एवढ्याने सुटत नाही. पुराणग्रंथात बहादूरशहाचा निर्देश ती व्यक्ती प्रत्यक्ष नसताना कसा येईल? पुराणात उल्लेखिलेली व्यक्ती बादशाहा नसून त्या नावाशी साम्यदर्शक अन्य कुणी असेल का? औरंगजेबचे दोन सरदार बहाद्दरखान आणि दिलेरखान यांनी डिसेंबर १६७१ मध्ये पुण्यावर स्वारी केली होती आणि मोठी कत्तल करून त्यांनी पुणे ताब्यात घेतले होते, अशी इतिहासात नोंद आहे. त्या बहाद्दूरखानचे नाव पुराण रचणाऱ्या व्यक्तीच्या कानावर गेले असावे आणि काल्पनिक घटनाप्रसंगाची निर्मिती करताना त्या नावाचा वापर त्याने पुराणात केला असावा, असे गृहीत धरले तर पुराणातील कालखंड सुसंगत ठरतो.

**पुराणनिर्मितीचा हेतू :**

आपण एक धार्मिक आणि भक्तिपर ग्रंथ लिहीत आहोत, ही रचनाकाराची भूमिका आहे. त्यामुळे ग्रंथारंभी, अध्यायाच्या सुरुवातीला नमन येते. पुराणात जाति-व्यवस्थेला मान्यता असली, तरी मनाचे औदार्य आहे; वृत्तीत व्यापकता आहे. येथे भक्ती आणि नीती, संस्कार आणि सदाचार यांना प्राधान्य आहे. धर्मबंधने, आचारबंधने सांगितली असली, तरी दृष्टी मानवतावादी आहे. अशा प्रकारच्या जातिपुराणांमध्ये जातीवर लक्ष केंद्रित झालेले असल्याने जातीची उत्पत्ती, तिच्यातील महत्त्वाच्या व्यक्ती, आचारधर्म, नीतिनियम यांना येथे महत्त्व असते. समाजाचा उद्धार, एकात्मता आणि बंधुभाव परिपुष्ट करणे हा हेतू पुराणरचनाकाराचा असलेला दिसतो.

**हालुमत पुराणाचे आशयसूत्र :**








मंगळवेढा तालुक्यातील हुलजंती या गावी प्रतिष्ठापूर्वक नांदणाऱ्या, आंध्र-कर्नाटक-महाराष्ट्र या राज्यांतील पशुपालक कुर्मा-कुरूब धनगर समाजाचा श्रद्धाविषय झालेल्या या महापुरुषाचे रूपांतर एका दैवतात कसे झाले, याची कथा या पुराणात आहे. हुलजंती या क्षेत्राच्या वर्णनाबरोबरच कुरूब-धनगरांच्या महाराष्ट्रातील अनेक पवित्र तीर्थक्षेत्रांची वर्णने पुराणात आहेत. महालिंगरायाचे वंशज, त्यांचा वंशविस्तार, त्यांचा महाराष्ट्र-कर्नाटकात तसेच अगदी दिल्लीपर्यंत झालेला प्रवास, त्या त्या ठिकाणी आलेले अनुभव, भेटलेल्या व्यक्ती, योगसामर्थ्यावर केलेले चमत्कार, भांडणे, संघर्ष, गुरुदीक्षा, गुरोपदेश इ. गोष्टींचे कथन या पुराणात आले आहे. त्याचप्रमाणे महालिंगरायाचे गुरू बिरोबाचे चरित्र विस्तारपूर्वक ग्रंथात आलेले आहे. ठिकठिकाणी भेटलेले दैत्य, त्यांचा वध, उद्धार करून त्यांना दिलेले वरदान अशा अनंत गोष्टी पुराणात आहेत. चिंचणीची मायक्का, अक्कम्मा यांच्याशी बिरोबाशी असणारे नातेसंबंध पुराणात सांगितले आहेत. क्षेत्राचे माहात्म्यवर्णन, महापुरुषांचे दैवतीकरण याचे अनेक तपशील पुराणात आढळतात. पुराणाच्या आरंभी हालुमतपरंपरेची उत्पत्ती, त्यांच्या विविध कुलपरंपरा सांगितल्या आहेत. हेळवी गावोगाव फिरून लोकांचे कुलवृत्तांत सांगतात, वंशवेलीचे कथन करीत असतात. ती हेळव्यांची कथनशैली प्रस्तुत पुराणात वापरलेली आहे.

**विविध वंशांची उत्पत्ती, हालुमतांचा वंशविस्तार :**

याआधी सांगितल्याप्रमाणे जातिपुराणांमध्ये जातींच्या उत्पत्तिकथनाला फार महत्त्व असते. प्रस्तुत हालुमत पुराणामध्ये कुरूब-धनगर जातीची उत्पत्ती, विविध उपजाती, कुलपरंपरा, विविध वंशांची उत्पत्ती, त्यांच्यातील नातेसंबंध, विविध वंशांचा विस्तार अशा अनेक गोष्टी या पुराणाच्या सुरुवातीच्या भागात आल्या आहेत. हे सांगत असताना विविध दंतकथा, आख्यायिकांची जोड दिली आहे.

हालुमत या संज्ञेचा अर्थ सांगताना एका दंतकथेचा निर्देश केला होता. त्या दंतकथेची एक पर्यायकथा कुरूब-धनगरांच्या जातिउत्पत्तीच्या संदर्भात प्रस्तुत पुराणाच्या आरंभी सांगितली आहे. एकदा शिव-पार्वती एकत्र बसले असता पार्वतीने चिखलाच्या दोन मूर्ती बनविल्या. त्या मूर्तींमध्ये शिव-शंकराने प्राण भरला. बालिकेचे नाव मुद्यव्वा आणि बालकाचे नाव मुदगोंडा असे ठेवले. आणि त्या दोघांचे लग्न लावण्यात आले. याच जोडप्यापासून हालुमत वंशाचा विस्तार झाला.

दुसऱ्या वंशाची निर्मिती कशी झाली हे सांगताना आणखी एक कथा येते. हिमगिरीवर पार्वती तपश्चर्या करीत बसली असता तेथे शंकर प्रकटले आणि पार्वतीची भक्ती पाहून शंकराने आनंदाने आपल्या जटा तीनवेळा झटकल्या. त्यातून तीन मुले उत्पन्न झाली. त्याचप्रमाणे पुत्रकामेष्टी यज्ञातून सहा मुलींचा जन्म झाला आणि सहा मुलींची लग्ने मुदगोंडा यांच्या सहा मुलांशी लावण्यात आली.

भविष्य सांगत फिरणाऱ्या हेळवी वंशाची, कृषिकर्म करणारे कुडवक्कलगे, लोकांचे मनोरंजन करणारे आणि स्मशानात राहणारे सुडगाडसिद्ध म्हणजे 'मसणजोगी' या वंशांची निर्मिती कशी झाली आणि ती कोणकोणत्या मूळ पुरुषापासून झाली. याचा वृत्तान्त पुराणात आला आहे.

मुदगोंडाचा मुलगा पदमगोंडा जाग्रतपूर (हुलजंती) येथे शेती करीत होता. शेतात नांगर चालवताना त्याचा नांगर शेतात असणाऱ्या तीन डोळ्यांच्या वारुळात घुसला आणि त्या वारुळातून पांढरी, काळी आणि रेशमी रंगाची असंख्य मेंढरे निघाली. त्या मेंढरांचा सांभाळ पदमगोंडा करू लागला. हाच धनगर कुरूबांचा मूळ वंशज. त्याच्यापासूनच हालुमताचा विस्तार झाला. या कुरूब-धनगरांचे उण्णीकंकण आणि हत्तीकंकण असे दोन भाग झाले. उण्णीकंकण म्हणजेच हंडे धनगर, हत्तीकंकण म्हणजे बंडे धनगर. हंडे धनगरांचे झेंडेधनगर आणि डंगेधनगर असे दोन उपवंश निर्माण झाले. यासंबंधीचा सविस्तर वृत्तांत पुराणात आलेला आहे.

जाती, कुळ, वंश याची निर्मिती कशी झाली हे सांगताना अनेक अलौकिक घटनाप्रसंग, दैवी चमत्कार घडलेले दाखविले आहेत. पण या सर्व जातिकुळांच्या निर्मितीमागे शंकर-पार्वती कसे कारणीभूत ठरले, याचा आवर्जून उल्लेख पुराणात आला आहे. मानववंशशास्त्राला ह्या गोष्टी मान्य होतीलच असे नाही. पण ह्या रचनाकाराच्या

कल्पनेचा आविष्कार आहे, इतके लक्षात घ्यावे लागेल.

पदमगोंडाच्या वंशातील संबीकराया हा महापुरुष कर्नाटकात गेला. तो काकनूर-करीगुड्ड, ता. बदामी, जि. बिजापूर येथे राहिला. अनेगोंदीचा राजा मणिगोला याची मुलगी चंद्रभागा हिच्याशी त्याचे लग्न झाले. त्याच्या वंशात करीगोंडा व केंचेगोंडा या महापुरुषांचा जन्म झाला. ते पुन्हा महाराष्ट्रात आले आणि बिलवाडपूर (शिंगणापूर) या गावची स्थापना करून तेथे राहू लागले. करीगोंडा याच्या पोटी तुक्कपराय आणि सोमराय ही दोन मुले जन्मली. त्या मुलांनी बारामती आणि तेरामती या गावांची निर्मिती केली. ज्या महापुरुषांच्या चरित्रचित्रणावर 'महिमांतक महालिंगराया हालुमत पुराण' रचले गेले आहे, त्या चरित्रनायकाचा जन्म तुक्कपराया यांच्या वंशात झाला. त्या महालिंगरायाचे चरित्र पुराणात उशिरा आले आहे. त्याचे विवेचन पुढे येईलच.

**बिरदेवाची जन्मकथा :**

मंजुळसेन राजाची कन्या सुरवंतीच्या इच्छेनुसार बिनपुरुषाचा, विनापापादोषाचा, अयोनिज स्वरूपात बिरोबाचा जन्म झाला आणि कामाईशी त्याचे लग्न झाले, अशा आशयाची कथा महाराष्ट्रातील धनगरांच्या लोकगीतांत आलेली आहे. प्रस्तुत 'महिमांतक महालिंगरायाचे हालुमत पुराण' यामध्ये मात्र बिरदेवाची यापेक्षा वेगळी कथा आलेली आहे. ही महालिंगरायाचे चरित्रचित्रण करण्याआधी प्रस्तुत पुराणात सांगितली आहे. कारण बिरदेव हे महालिंगरायाचे गुरू होते. त्यामुळे गुरूची कथा आधी सांगून नंतर महालिंगरायाचे चरित्रवर्णन पुराणकाराने केले आहे.

तिपरगी गावचा राजा आनंदरायाच्या पोटी गिरीजक्करायाचा जन्म झाला. या गिरीजक्करायाचे सप्तजलकन्यांशी लग्न झाले. या सप्तजलकन्यांपैकी कमलादेवीच्या पोटी आकाशभरम या महापुरुषाचा जन्म झाला. आकाशभरम मोठा झाल्यावर त्याचे लग्न नारदाची बहीण सुरम्मादेवीशी झाले. आकाशभरम आणि सुरम्मादेवी चंदनगिरी येथे राहू लागले. आकाशभरम आणि सुरम्मादेवी यांना महादेवाच्या आशीर्वादाने वीरभद्र-बीरदेव हा पुत्र झाला. आकाशभरम आणि नारदाची बहीण सुरम्मादेवी यांची बीरदेवचरित्राशी जोडलेली उपकथा महाराष्ट्राला ज्ञात नाही. महाराष्ट्रातील धनगरांच्या लोकगीतांत बीरदेवाचा जन्म होण्याआधी सुरवंतीचा गर्भ नष्ट करण्याचा प्रयत्न मंजुळसेन राजा हरतऱ्हेने करतो. तशाच प्रकारचा प्रयत्न प्रस्तुत पुराणात आलेल्या कथेत नारद सुरम्मादेवीच्या पोटी बीरदेवाचा जन्म होऊ नये म्हणून करतो. दोन्ही कथांत आलेला कल्पनाबंध मात्र सारखा आहे.

सेवकांमार्फत बीरदेवाचा वध करण्याचा नारदाचा प्रयत्न; पण बाळाचा वध न करता सेवक त्याला जंगलात कदलीबनात सोडून देतात. (हे कदलीबन नंदीकुरवी, ता. रायबाग, जि. बेळगाव येथे असल्याचे डॉ. ढेरे त्यांच्या 'तुळजाभवानी' या ग्रंथात सांगतात. पृ. ५२.) कदलीबनात प्रत्यक्ष शंकर-पार्वती येऊन बीरदेवावर कृपा करतात. त्यामुळे शक्तीच्या पोटी जन्मलेल्या मायक्का आणि अक्कमा बीरदेवाचे संगोपन करतात. नारदाची मुलगी कन्नीकामा हिला पळवून आणून बीरदेव तिच्याशी लग्न करतो.

अम्मनगुड्ड, ता. सिंदनूर जि. रायचूर येथे कोणूर राक्षसाचा वध, रेवणसिद्धास कुंभाभिषेक, गोदावरीच्या तीरी मुंगी पैठण येथे पंचधातूच्या काशिलिंगाची स्थापना, जंबगी (जमखंडी) येथे कोनासूर दैत्याचा वध, बंकापूर येथे बंका राक्षसाचा वध, खिद्रापूरची प्रतिष्ठापना, संकेश्वर येथे संकासूर राक्षसाचा वध अशा अनेक घटनाप्रसंगांतून बीरदेवाचे माहात्म्य पुराणकाराने कथन केले आहे.

बिरप्पाची अनेक मंदिरे महाराष्ट्रात-कर्नाटकात आढळतात. आरेवाडी हे बिरोबाचे आद्यस्थान असल्याची भावना कुरूब-धनगरांमध्ये आहे. आरेवाडीला बिरोबा-बरोबरच सूर्याबाला मंदिराच्या गाभाऱ्यात पूजले जाते. तेथे कामाईचे मंदिर बाजूला आहे. कामाईची प्राचीन पाषाणमूर्ती मंदिरात आहे. आरेवाडीचा बिरोबा पट्टणकडोलीला आला, अशीही धारणा हालुमतांमध्ये आहे. बिरोबाचे रूपांतर अनेक ठिकाणी वीरभद्रात झालेले आढळते. अनेक ठिकाणी असणारी बिरोबाची मंदिरे आता वीरभद्राची मंदिरे म्हणून नावारूपाला आलेली आढळतात. पुणतांबे तालुक्यातील धोत्रे गावी बिरोबाला वीरभद्र म्हणून प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. बेळगाव जिल्ह्यातील चिक्कोडी तालुक्यातील यडूर हे गाव वीरभद्राचे स्थान म्हणून आज नावारूपाला आलेले असले, तरी ते

मूळ बिरोबाचे ठाणे होते. सुमारे पाचशे वर्षांपूर्वी बिरोबाच्या ठिकाणी वीरभद्राची प्रतिष्ठापना केली आहे. धनगर आणि वीरशैव यांच्यात यासंबंधी वादविवाद झाला होता. १९२७ साली करवीराप्पा शिवप्पा छत्रे (निपाणी) आणि वीरशैव समाज यांच्यात या संदर्भात खटला सुरू होता. लेपाक्षीचा वीरभद्रही मुळात बिरप्पा होता. सिद्धेश्वर-कुरोली (ता. खटाव, जि. सातारा) येथे आज सिद्धेश्वर नाव धारण करून प्रतिष्ठा पावलेला देव मुळात बिरोबा होता, याचे पुरावे सापडतात.

आता विठ्ठल-बिरोबा स्थान। एक मैल कुरोलीपासून
या भागाचे भूषण। अति छान रमणीय ते।।

असा निर्देश श्री. ना. ग. देशपांडेविरचित 'सिद्धेश्वर-माहात्म्य' या ओवीबद्ध ग्रंथात आला आहे. याचा अर्थच असा होतो, की सिद्धेश्वर कुरोली हे मूळचे बिरोबाचे ठाणे होते.

थोडक्यात, बिरोबा हे हालुमत-कुरूब-धनगरांचे आद्यदैवत होते, धनगरांच्या अनेक लोकदैवतांचे प्रेरणास्थान होते. त्यामुळे त्या देवतेची अनेक मंदिरे आंध्र-कर्नाटक-महाराष्ट्रात आढळतात.

**महालिंगरायाची चरित्रकथा :**

अनेगुंदी (अनेगुंदी हे विजयनगरच्या जवळ तुंगभद्रा नदीकाठी वसलेले गाव) घराण्यातील करीगोंडा व केंचगोंडा हे दोघे भाऊ बिलवाडपूर (शिखर शिंगणापूर) येथे आले. यापैकी करीगोंडा यास तुक्कपराय व सोमराय ही दोन मुले होती. सवाळी (बेगमपूरजवळ, ता. मोहोळ जि. सोलापूर) गावच्या पाटलाच्या मुलीशी–अमृतबाईशी–तुक्कपरायाचे आणि शेजाळघराण्यातील कनकाबाईशी सोमरायाचे लग्न झाले.

करई नदीकाठची बारा खेडी एकत्र करून बारामतीची निर्मिती करून सोमराया तेथे राहिला. करई नदीच्या उजव्या बाजूच्या १३ गावांना एकत्र करून तेरामतीची निर्मिती करून एकूण २५ गावांचे राज्य तुक्कपराय करू लागला. सोमराया पाटील झाला. एके दिवशी सोनारसिद्ध येथे आले. दोघा भावांनी गुरूचे पूजन केले. त्या वेळी राज्यकारभार सोडून बिलवाड (शिंगणापूर) येथे तपश्चर्या कर, अशी आज्ञा सोनारसिद्धाने तुक्कपरायास दिली. त्याप्रमाणे तुक्कपराया पत्नीसह शिंगणापूरला गेले. तेथे तुक्कपरायाच्या पोटी महालिंगराया व जक्कपराया ही दोन मुले झाली. महालिंगराया म्हणजेच बप्पण्णा. त्याचा जन्म विजयनाम संवत्सर शुक्लपक्ष रविवार ब्राह्मी मुहूर्तावर बारामती येथे असतानाच झाला होता. बप्पणाचे महालिंगराया हे नाव गुरू सोनारसिद्धानेच ठेवले आणि हाच हालुमताचा अधिपती होईल, असे भविष्य वर्तविले.

रा. चिं. ढेरे यांनी 'शिखर शिंगणापूरचा शंभू महादेव' या नावाचा बृहद्ग्रंथ लिहिला आहे. ग्रंथातील शिव-राजनीतीच्या गंगोत्री या प्रकरणात आज्ञापत्र, पंचोपाख्यान, विक्रमबत्तिशी, वेताळपंचविशी, शालीहोत्र आणि चाणक्यनीति या ग्रंथांची रचना महालिंगदास कवीने केल्याची माहिती सांगितली आहे. हे महालिंगदास मुक्तेश्वरापूर्वी शके १४८६ च्या दरम्यान होऊन गेले. ते शिवभक्त साधू होते. महालिंगदास स्वतःला महालिंगाचा दास म्हणवितो. 'महालिंग' हे शिववाचक नाव आहे, हे उघड आहे. आता असा प्रश्न उपस्थित होतो, की हे कोणत्या क्षेत्रातील शिवाचे नाव आहे? असा प्रश्न ढेरे यांनी उपस्थित केला आहे (ढेरे : २००१ : २०४).

त्या प्रश्नाच्या उत्तराचा धांडोळा घेताना महालिंग म्हणजे मल्लिकार्जून हे गृहीत करून श्रीशैल मल्लिकार्जुनपासून शिखरशिंगणापूरच्या शंभूमहादेव यांपैकीच कोणीतरी 'महालिंग' देव असावा, असा कयास डॉ. ढेरे यांनी बांधला आहे. श्री. ना. कृ. गद्रे यांनी आपल्या 'महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग' या ग्रंथात तीन वेळा महालिंगाचा शिखर शिंगणापूर येथे निवास होता, असे विधान केले आहे. त्यामुळे तो शंभूमहादेवच असावा, असे ढेरे यांना वाटते. पण महालिंग कोण? याचे प्रमाण शोधणे नव्या संशोधकांपुढे एक आव्हान आहे, असे विधान ढेऱ्यांनी केले आहे. श्री. गद्रे यांना हुलजंतीच्या महालिंगरायाचे चरित्र ज्ञात असते, तर कदाचित त्यांना हा प्रश्न पडला नसता. कदाचित महालिंगदास या कवीचे आराध्यदैवत हुलजंती महालिंगराया नसेल ना? कदाचित असेल, असा माझा तर्क आहे.

महालिंगरायाच्या चरित्राबरोबरच त्यांच्या जीवनातील अनेक घटनाप्रसंगांचे चित्रण हालुमत पुराणात आहे. त्यांतील काही ठळक घटनांचा येथे केवळ उल्लेख करता येईल. महालिंगराया, भाऊ जक्कपराया आपल्या

मित्रांबरोबर लहानपणी खेळत असताना त्यांतील एका मुलास साप चावला व त्या मुलाचा मृत्यू झाला. तेव्हा महालिंगरायाने त्या सर्पाला पकडले, त्या मुलाच्या मृतदेहावरून सर्प फिरवला आणि मुलास जिवंत केले. आणि त्या सापाला सांगितले, की 'तुला भविष्यात नागकाठीच्या रूपात माझ्याजवळ राहावे लागेल. आता तू जा.' असे सांगून त्यास जंगलात सोडून दिले. दोघा भावांना घरात ठेवून घरास कुलूप लावून आई गेली असता घराचे कुलूप आपोआप निखळून पडले. महालिंगरायास लहान वयातच योगिक सामर्थ्य प्राप्त झाले होते, हे या प्रसंगातून कळते.

शिखर शिंगणापूर (बिलवाड) परिसरात दुष्काळ पडल्याने शेळ्यामेंढ्यांना चारापाणी मिळेना. त्यामुळे महालिंगरायाचे कुटुंब चारापाणी मिळेल तिकडे फिरू लागले. नातेपुते, खरसुंडीमार्गे अनेक ठिकाणी फिरत त्यांचे मूळगाव जाग्रतपूर (हुलजंती) येथे आले. महालिंगराया आता तरुण झाल्याने त्यांचे लग्न थांब, ता. इंडी, जि. विजापूर येथील तात्याराव व हौसाबाई यांची मुलगी लक्ष्मी हिच्याशी जित्ती नारायणपूर येथे झाले.

एकदा देवाच्या पूजेसाठी पाणी आणावे म्हणून लक्ष्मी नदीवर गेली असता, तिने उष्टे पाणी आणले आणि ते पूजेसाठी तिने वापरले. हे जेव्हा महालिंगरायास समजले, तेव्हा त्यांना राग आला. लक्ष्मीचे वडील वारले असे सांगून महालिंगरायाने तिच्या सोबतीला दोन वाघ देऊन माहेरास पाठविले. लक्ष्मी एकटीच आल्याचे पाहून वडिलांना आश्चर्य वाटले. तेव्हा वाघ माझ्या सोबतीला आहेत असे ती म्हणाली. अचानकपणे तिच्या पाठीतून ओंजळभर पाणी बाहेर पडले आणि ती मरण पावली.

गुरू बिरेशने महालिंगरायाकडे वाघाच्या दुधाच्या खरवसाची मागणी केली असता अनेक संकटांचा सामना करून गुरूंची मागणी त्यांनी पूर्ण केली. पांडरकोटी (जलदुर्ग–लिंगणूर, जि. रायचूर) येथे जाऊन धर्म–भीम यांच्याशी सामना करून तेथील बागेतील फुले आणली व त्यांच्या ताब्यातील अनेक साधूसत्पुरुषांची सुटका केली. हे धर्म-भीम कोण, ते कळत नाही.

लक्ष्मीच्या मृत्यूनंतर तुरबीहट्टी येथील कोरी चंद्रम्मा यांची मुलगी इरम्माशी महालिंगरायाचे लग्न झाले. त्यास इरम्मापासून चार मुले झाली. रेब्बेराय, कणमुत्या, सोमराया अशी त्यांची नावे होती.

होन्नोटगीचे संकपाळ गौडा, बेट्टीगिरीचे पाटील, डेंकन गौडाकडून महालिंगरायाची अवहेलना, त्याची त्याला झालेली शिक्षा, मठ चिक्कलगीच्या यमन्नव्वाची भेट अशा अनेक प्रसंगांचे चित्रण पुराणात आहे. महालिंगरायाचे माहात्म्य सांगणाऱ्या अनेक गोष्टींचे चित्रण करण्याबरोबरच महालिंगरायाने अनेक ठिकाणी गुरू बिरेशाच्या मंदिराची स्थापना केली याचे संदर्भ पुराणात आहेत. त्यांनी केलेला शिष्यांचा उद्धार, उपदेश, दिलेली दीक्षा, लोककल्याणाची कामे याचे संदर्भ पुराणात आले आहेत. त्या सर्व गोष्टी पुराणात वाचता येतील. एकदा शिव-पार्वती महारोग्याच्या रूपात महालिंगरायाची परीक्षा घेण्यासाठी आले, तेव्हा त्यांना ओळखून महालिंगरायाने त्यांची कशी सेवा केली ते वाचले असता, देवदेवतांबद्दल, गुरूविषयी त्यांच्या ठिकाणी असणाऱ्या श्रद्धेचा अनुभव आपणास येतो.

गुरू बंगालजोगी यांच्या इच्छेनुसार उबळी ठाण्यात जाऊन महालिंगरायाने शिवसाहित्य आणले. त्यानंतर महालिंगरायाचा पालखीसोहळा भक्तांनी साजरा केला. वड्डुवालगाचा कार्यक्रम केला. महालिंगरायाविषयी भक्तांना वाटणारी श्रद्धा यातून व्यक्त होते. शंकर–पार्वतीपुढे महालिंगरायाने हेडमचा खेळ केला. पोटावर तलवार मारून पोटातील आतडी बाहेर काढली, पण शिवकृपेने ती आतडी पोटात घालून जखमा नाहीशा झाल्या अशा अद्‌भुत घटना ज्या महालिंगरायाच्या जीवनात घडल्या, त्यांचे चित्रण श्रद्धापूर्वक पुराणकाराने केले आहे.

महालिंगरायाने वाघसिंहादी अनेक हिंस्र पशूंना आपल्या मनाप्रमाणे वागविले. वाघसिंह सतत त्यांच्या सोबतीला असत. कन्नडमध्ये वाघ-सिंहांना हुली म्हणतात. त्यावरूनच जाग्रतपुर गावाला हुलजंती असे नाव मिळाले. याच गावात महालिंगरायाने श्रावण अमावस्या, रविवार या दिवशी समाधी घेतली. ते लिंगैक्य झाले. भक्तांनी महालिंगरायाचे मंदिर बांधले. गावाला व्याघ्रमुखाची वेश बांधली. त्यांची पालखी व्याघ्रमुखांनी सजविली जाते. धनगर-कुरूब कुळातील असणारा कुडवक्कलगा हा महापुरुष कालांतराने हालुमतांचा कुलदेव झाला.

**नाथजोगी आणि हालुमत :**

आंध्र प्रदेशातील कुरमा, कर्नाटकातील कुरूबा आणि महाराष्ट्रातील धनगर हे आर्येतर आहेत, त्यामुळे ते रुद्रशिवाचे उपासक आहेत. विदर्भ, मराठवाडा, पश्चिम महाराष्ट्र, विशेषतः माणदेश, उत्तर कर्नाटक या प्रदेशातील कुरूब-धनगरांच्या पारंपरिक श्रद्धांवर वीरशैवांचा विशेष प्रभाव असलेला दिसतो. वीरशैवांबरोबरच सिद्धपरंपरेचा आणि नाथसंप्रदायाचाही मोठा प्रभाव जाणवतो. जावळी, म्हसवड, खरसुंडी, सोनारी इ. ठिकाणी असणारे धनगरांचे देव भैरवरूप असून ते मूलतः सिद्धपरंपरेशी नाते सांगतात. महाराष्ट्र–कर्नाटक सीमाप्रदेशात नांदणारा अप्पाची वाडी येथील हालसिद्ध थेट सिद्धपरंपरेशी नाते सांगतो आणि त्याच वेळी हालुमतांशी स्वतःला जोडून घेतो. यामुळेच हाल-सिद्ध असे नाव धारण करतो. नाथजोगी गोसावीदेखील धनगर-कुरूबांचे देव आपले असल्याचा दावा करतात. मंगळवेढा, जि. सोलापूरजवळ खवे, जिती ही गावे गोसावीबहुल आहेत; नव्हे, ती गावे गोसाव्यांची गावे म्हणून ओळखली जातात. महालिंगरायाची भटकंती या गावांमध्ये सतत होती. मरवडे, खवे येथे तर महालिंगराया, बिरोबा यांची प्राचीन मंदिरे आहेत. त्या गोष्टींचा उल्लेख वारंवार हालुमत पुराणात आलेला आहे. सोनारीहून (परांडा) वारंवार महालिंगरायास भेटण्यासाठी गौडबंगालजोगी येत असतो, त्याचा उल्लेख पुराणात आहे. तो सोनारीचा सोनारसिद्ध आहे. धनगरांचे अनेक देव मुळात सिद्धपुरुष आहेत, याचा प्रत्यय पुराणाचे वाचन करताना वारंवार येतो. महालिंगराया गौडबंगालजोगी यांना गुरूप्रमाणे मान देतात. केसांच्या जटा, लांब वाढलेली दाढी, हातात त्रिशूल, नागकाष्ठ, लाल वस्त्र असा पोशाख गौडबंगालजोगीचा असतो; तसाच परिवेश कुरूब-धनगरांच्या देवदेवतांचाही असतो.

जातींची प्राचीन परंपरा आणि जातिवंशाची थोरवी सांगण्याच्या हेतूने जातिपुराणे निर्माण झालेली दिसतात. 'हालुमत पुराण' हे धनगरजातीचे पुराण असून त्यातून धनगरांचा सामाजिक आणि सांस्कृतिक इतिहास प्रकट होतो. या पुराणाचे स्वरूप धार्मिक असल्याने अत्यंत श्रद्धेने त्याचे पठण आणि वाचन केले जाते. धनगर-जातीमध्ये अनेक योगिपुरुष झाले, ते आपल्या जातीच्या उद्धारासाठी झटले, जातीचे आणि जातीतील लोकांचे उन्नयन त्यांनी घडविले. योगिपुरुषांबरोबरच धनगर समाजात राज्यकर्तेही झाले. त्यांचे संदर्भ प्रस्तुत पुराणात आहेत. या पुराणातील कथांमध्ये अतिशयोक्ती, अद्‌भुत घटना-प्रसंगांचे दर्शन घडते. तो पुराणवाङ्‌मयाचा विशेष आहे. आधुनिक काळात धनगर ही जात कनिष्ठ मानली गेली, त्याविषयीची खंत समाजात असल्याने आपल्या कुळाची, वंशाची, जातीची थोरवी कथन करण्यासाठी आणि जातीचे माहात्म्य लोकमानसावर ठसविण्याच्या हेतूने ह्या पुराणाची निर्मिती झाली, असे म्हणता येईल.

**संदर्भ ग्रंथ :–**

१. आतकर, झगडे (संपा.); (२००६) मराठी मौखिक वाङ्‌मय, श्रीविद्या प्रकाशन, पुणे.

२. खरे, ग. ह. (१९५८); महाराष्ट्राची चार दैवते, ग. ह. खरे, सदाशिव पेठ, पुणे.

३. गवते, ज्ञानेश्वर (२०११); धनगरांच्या लोक-साहित्यातील समाजदर्शन, कैलास पब्लिकेशन, औरंगाबाद.

४. जिरोबे, राजेंद्र (१९७९); श्री बसवेश्वर आणि पदलित शिवशरण, श्री मृत्युंजय शरण साहित्य प्रचारक संघ, मुंबई–७१.

५. जोशी, शं. बा. (प्रकाशनकाल नाही); मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या, व्हीनस प्रकाशन, पुणे.

६. ढेरे, रा. चिं. (२००१); शिखर शिंगणापूरचा श्री शंभूमहादेव, श्रीविद्या प्रकाशन, पुणे.

७. ढेरे, रा. चिं. (२००५); श्री. विठ्ठल : एक महासमन्वय, पद्‌मगंधा प्रकाशन, पुणे (द्वि. आ.)

८. ढेरे, रा. चिं. (२००७); तुळजाभवानी, पद्‌मगंधा प्रकाशन, पुणे.

९. नागेगौडा, एच. एल. (१९९८); इसेन्शल ऑफ कर्नाटक फोकलोर, कर्नाटक जानपद परिषद, बेंगलोर.

१०. बळे, बाळासाहेब (१९८९); धनगरांच्या देवता : धुळोबा–भिवया, सविता प्रकाशन, औरंगाबाद.

११. मांडे, प्रभाकर (१९८५); गुप्त आणि सांकेतिक बोली, सविता प्रकाशन, औरंगाबाद.

१२. मांडे, प्रभाकर (२०११); लोकगायकांची परंपरा, गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद.

१३. सेट्टर, सोन्थायमर (प्रकाशनकाल नाही);

मेमोरियल स्टोन्स, इन्स्टिट्युट ऑफ इंडियन आर्ट हिस्टरी, कर्नाटक युनिव्हर्सिटी, धारवाड. साऊथ एशिया इन्स्टिट्युट, युनिव्हर्सिटी ऑफ हायडलबर्ग, जर्मनी.



अनुक्रमणिका

# गुन्हेगारीने विव्हळणारे सध्याचे जग!

बाबूराव चंदावार

**प्रस्तावना :**

गुन्हा आणि गुन्हेगारीविषयी सध्या जे जगात बोलले जाते आहे, त्यावरून वाटते की जगात वाढत्या प्रमाणात गुन्हे घडत आहेत, असेच मानले जात असावे. पण हे जर मानायला हवेच असेल, तर याची नेमकी कारणे काय असू शकतील यावर विचार करायला हवा! पण, सकृद्दर्शनी दिसून येते ते असे, की यावर विचार करण्यासाठी प्रवृत्त होता येत नाही. अर्थात, हीच जर परिस्थिती झालेली असेल, तर ती तशी का झालेली असावी, याचा शोध घ्यायला हवा. पण, याचा शोध घेण्यासाठी ज्या तऱ्हेची मनोवृत्ती उपलब्ध असावयाला हवी आहे, तीच कदाचित मुळात उपलब्ध नसावी असे म्हणावे किंवा काय, असा एक प्रश्न उपस्थित होतो. अर्थात, तो उपस्थित झालेलाच आहे असे मानूनच विचार करण्याची एक पद्धती असू शकते. पण तो उपस्थित झालेलाच नाही असे जर मानले, तर त्याचीही एक विचार करण्याची पद्धती असू शकते. गुन्हे आणि गुन्हेगारीची कारणे शोधण्यासाठी विचारप्रवृत्त होता येत नसल्याची मनोवृत्ती ही एका विशिष्ट तऱ्हेच्या बधिरतेतलीच जर मानली, तर ही बधिरता माणसाच्या माणूसपणा हरवत जात असल्याच्या वस्तुस्थितीतली म्हणावी किंवा काय, असाही एक प्रश्न उपस्थित होतोच! म्हणून माणसाचा किंवा मनुष्यसमूहाचा माणूसपणा हरवण्याच्या वस्तुस्थितीची निर्मिती होत असल्याचे जर गृहीत धरले गेले, तर त्या आधारे कारणांचा शोध घेण्याच्या दृष्टीने विचारप्रवृत्त होता येऊ शकेल. पण माणूसपणा हरवण्याची वस्तुस्थिती मान्य करण्याकडे सध्याच्या परिस्थितीचा कल झालेला नसावा, असे म्हणता येऊ शकते. कारण सध्याची परिस्थिती ही अपरिहार्य अशा गरजेतून निर्माण झालेली आहे, असा एक समज करून घेतला गेला असल्याचे दिसते आहे व हा समज दृढ व दृढतर करून घेतला जाण्याची एक प्रक्रियाही विकसित केली गेली असावी, असेही वाटते आहे! ही प्रक्रिया गतिमान राहण्याच्या गरजेतली मानून तिची अपरिहार्यता अधोरेखित केली जातेच आहे. तेव्हा अपरिहार्य गरजेतून गतिमान राहण्याच्या प्रक्रियेचे प्रयोजन जर मानले जात असेल, तर त्याचे स्वरूप लक्षात घेता यायला हवे. अर्थात हे लक्षात येण्यासाठी मुक्त मनाची आवश्यकता असते. पण सध्याच्या माणसाच्या मनाची अवस्था मुक्त राहण्याची दिसत नाही, हेदेखील लक्षात घ्यायला हवे!

**१ : प्रयोजन नसलेले धर्मसंप्रदाय**

वारेने वेष्ठिलेला गर्भ जसा असावा, तसेच अपरिहार्यतेच्या गांजणूक करणाऱ्या परिस्थितीने वेढलेल्या माणसाच्या मनाचेही झालेले आहे. म्हणून जन्माला येणाऱ्या अर्भकाची जशी वारेने वेष्ठिलेल्या गर्भातून मुक्तता व्हावी लागते, तशीच मुक्तता गांजवत ठेवणाऱ्या परिस्थितीने वेढलेल्या मनाचीही व्हावीच लागते. कारण वारेच्या वेष्ठनातून मुक्त झाल्याशिवाय अर्भकाचा जन्म जसा संभवतच नाही, तसेच अपरिहार्य मानल्या गेलेल्या गांजवत ठेवणाऱ्या टणक परिस्थितीच्या कवचासमान वेष्ठनातून बाहेर पडल्याशिवाय माणसाच्या मनाला मुक्तता मिळणेही संभवतच नाही! पण हे माणसाला जाणवायला हवे आहे. अर्थात हे माणसाला जाणवतच नसावे, अशीच परिस्थिती झालेली आहे. तेव्हा प्रश्न जाणवण्याचा आहे. पण का जाणवत नसावे, हा या बाबतीतला प्रश्नही आहेच. 'समाधान मिळवता यायला हवे', असेच याचे उत्तर हवे आहे! कारण समाधान मिळवता येऊ नये अशीही उत्तरे दिली जातात व ती उपलब्ध होतही असतात. पण ती वेळकाढू असतात व ती तशीच असू शकतात! कारण वेळकाढूपणाच्या उत्तरातून वस्तुत: समाधान मिळत







अनुक्रमणिका

नसते व मिळवता येतही नाही. पण समाधान मिळत असल्याचे मात्र भासवता येऊ शकते. आजवर ते भासवता आलेलेही आहे. अनेकानेक धर्मसंप्रदायांचे अस्तित्व यातूनच निर्माण झालेले असून माणसाच्या मनाला मुक्तता देण्याचा अनाठायी वाटावा असा प्रपंच या धर्मसंप्रदायांनी मांडलेला आहेच! तरी माणसाचे मन अद्याप भयमुक्त झालेले नाही व ते भयमुक्त होणारही नाही, असेच दिसते आहे. कारण गांजवत ठेवणाऱ्या परिस्थितीने वेढलेले माणसाचे मन मुक्त करण्याच्या दृष्टीने धर्मसंप्रदायांनी प्रपंच निर्माण केलेला असूनही त्याचे प्रयोजन अद्याप तरी निर्माण होऊच शकलेले नाही.

**२ : सन्मुखता आणि विन्मुखता**

जर अपरिहार्य अशी गरज म्हणून काही असेलच किंवा असू शकणार असेल, तर त्याचा नेमकेपणा लक्षात घ्यायला हवाच! गतिमानता हे याचे लक्षण सांगितले जाते आहे. ज्यामुळे व ज्यातून पुढेच जाता येते व यात सातत्य ठेवलेच जाते, त्याला गतिमानता म्हटले जाते. पण कशासाठी व कुठे पुढे जायचे व त्यात सातत्यही ठेवायचे, याचे भान तर ठेवायलाच हवे! ते ठेवले जात नसावे म्हणून कशासाठी व कुठे पुढे जायचे हे कळत नसावे. 'गति तेचि मुखी नामाचे स्मरण, अधोगती जाण विन्मूखता' असे संत तुकाराममहाराजांनी त्यांच्या एका अभंगात म्हटले आहे. नामस्मरणाला 'गती' मानणारे संत तुकाराममहाराज याच्या विन्मुखतेला 'अधोगती' म्हणतात. तेव्हा 'गती' व 'अधोगती' या भक्तिमार्गातल्या अविचल धारणा झालेल्या आहेत. अशी कोणती धारणा पुढे जातच गतिमान होण्याच्या आकांक्षेत आहे, हे ओळखता यायला हवे. अर्थातच हे ओळखता येण्यासारखे आहे. कारण ज्या तऱ्हेची आकांक्षा आहे त्या तऱ्हेचीच गतिमानता असू शकेल, हे निश्चित आहे. म्हणून प्रश्न आकांक्षेचा आहे. जी आकांक्षा बाळगून पुढे जावेसे वाटते व त्यात गतिमानता आणावीशीही वाटते, तिचे स्वरूप एकदा उलगडले की नंतरचे सर्वच सोपे होऊन जाते. ज्याला अपरिहार्य गरज म्हणूनच संबोधिले जाते आहे, ते ज्या आकांक्षेतले असते, ते या वेळी तरी तसे पाहिल्यास अमूर्तच वाटते आहे. म्हणून जे अमूर्त आहे त्यावर झेप घेण्याची आकांक्षा माणसाच्या गरजेतली मानावी किंवा काय, हा एक या बाबतीतला प्रश्न उपस्थित होतो! जरी कालमानानुसार या प्रश्नाचे रूप बदलत गेलेले असले, तरी त्याच्या अमूर्ततेत बदल झालेला दिसत नाही. कारण जे अमूर्त आहे त्यावरच झेपावणे ही एक बेभान अवस्थाच असते. अशीच काहीशी बेभान अवस्था माणसाची झालेली आहे व ती जरी गतिमान दिसते आहे तरी ती अधोगतीकडे नेणारीच जर झालेली असेल, तर त्यातून विन्मुखता साधता यायला हवी, असे एक महत्त्वाचे भान ठेवणे गरजेचे आहे. तेव्हा जे अमूर्त आहे त्यावर झेपावण्याची सन्मुखता जर माणसाला भानावर ठेवणार नसेल तर ती एक माणसाची विन्मुखताच म्हणायला हवी. म्हणून भानावर ठेवणारीच सन्मुखता माणसाने बाळगायला हवी. अमूर्तावर झेपावण्याची सन्मुखता अधोगतीस कारण ठरू शकते, याचे भान ठेवायला हवे. सध्याच्या परिस्थितीत पुढे जाण्याच्या आकांक्षेतली गती व त्यातली गतिमानता जर अधोगतीकडे नेणारी होत असेल, तर माणसाने त्याच्या उद्धाराच्या शक्यतेकडेच सन्मुख व्हावयाला हवे आहे. म्हणून पुढे जाण्याच्या गतीला व त्याच्या गतिमानतेला माणसाच्या उद्धाराचा उद्देश जडायला हवा आहे. याला 'आत्मोद्धार' म्हणता येईल. याकडेच माणसाला नेणारा तो हवा, याचे भानही ठेवायला हवे आहे. तेव्हा गती आणि गतिमानता उद्धाराच्या दिशेने जाणारी व झेपावणारी असावी, याची अपरिहार्यताच सध्या माणसाला व मनुष्यसमूहांना खुणावते आहे, असे परिस्थितीत दिसणाऱ्या अनिश्चित अवस्थेत सध्या दिसते आहे. असे म्हणता येण्यासारखे झालेले असल्यास त्याकडे पहायचेच नाही म्हणून ते टाळत जायचे असे होऊ नये. पण कदाचित असे होत असावे म्हणता येण्यासारखी जागतिक पातळीवरची परिस्थिती सध्या झालेली असावी, असे वाटते!

**३ : आकांक्षाशुद्धीची प्रक्रिया जाणायला हवी**

जर गुन्हे आणि गुन्हेगारी वाढत असेल, तर या बाबतीतली जागतिक पातळीवरची परिस्थिती पडताळून

घेतल्यास दिसते ते असे, की ज्या तऱ्हेच्या आकांक्षांना गतिमान होताना पाहिले जाते आहे, त्या माणसाला व मनुष्यसमूहांना उद्धारक मानता येतील किंवा काय, याचा विवेक करण्यास प्रवृत्त होता यायला हवे. कारण कोणतीच मर्यादा नसलेली उपभोग घेण्याची आकांक्षा जर गतिमान केली जात असेल, तर त्यातून उपभोग घेता येऊ न शकण्याची परिस्थिती निर्माण होईल. ती स्वाभाविकपणेच निर्माण होतही असते. म्हणूनच आकांक्षापूर्ती होणार नाही, हे स्पष्टच आहे. पण, आकांक्षापूर्ती न होण्याची परिस्थिती हीच गतिमानतेच्या अतिरेकाची होऊन बसते व यातूनच आकांक्षापूर्ती करण्याचा हेतू बाळगूनच मर्यादा सोडून वागले जाते. हे वागणेच गुन्ह्यातले असू शकते हे लक्षात घेतले जात नाही. तेव्हा गुन्हा वा गुन्हेगारी अपेक्षापूर्तीच्या अभावग्रस्त परिस्थितीतूनच निर्माण होत असते, हे सहसा लक्षात घेतले जात नाही. ते लक्षात घेऊही नये असाच मनाचा कल होताना दिसते आहे. तेव्हा माणसाच्या गरजा म्हणून जे काही मानले गेले आहे त्याच्या पूर्ततेसाठी त्या प्राप्त करण्याच्या वेगात त्यांना जर आणले जात असेल, तर त्यातून मर्यादेचे पालन केले जाणे शक्य होत नाही. म्हणूनच नियंत्रण सुटल्यामुळे जसे वाहन अपघातग्रस्त होत असते, तसे उपभोगाची मर्यादा पालन न करू शकण्याच्या परिस्थितीत अवधान सुटल्यामुळे गुन्हे घडत असतात. हीच स्थिती अमर्याद उपभोगाच्या आकांक्षेतून निर्माण होत असते व ती झालेलीही आहे. म्हणून गुन्हे हे उपभोगाच्या अमर्याद वेगातलेच असू शकतात याचे भान व्हावे किंवा भान टेवता यावे म्हणून जी उपाययोजना करायला हवी असते, ती संयमातलीच असायला हवी, हे याच्या अभ्यासातून कळून येऊ शकते. म्हणून संयमाचा अभ्यास होत राहावा लागतो. तो अभ्यास जेव्हा होत नाही किंवा अभ्यास केला जात नाही, तेव्हा उपभोगाच्या अमर्याद आकांक्षेच्या वस्तुस्थितीतून दुःखे निपजतात व ती भोगावीच लागतात! तेव्हा दुःखाचे मूळ संयमाच्या अभावातले म्हणजे संयमाच्या अभ्यासाच्या अभावातलेच असू शकते हे ज्यामुळे जाणवू शकते, त्याचा बोध करून घ्यायचा असतो. भौतिक गरजा भागवताना अमर्याद उपभोगालाच केवळ प्राधान्य दिल्यामुळे जीवनात दुःखांना संधी निर्माण होत असतात, याचे भान ज्यामुळे बाळगता येऊ शकते अशाच तऱ्हेचा बोध करून घ्यायचा असतो. तो बोध करून घेण्याचाच खरा प्रश्न आहे, ज्यावर आत्तापर्यंत समग्रतेने विचार केला गेला आहे, असे म्हणता येऊ शकेल. पण त्याचा अपुरेपणा सध्या अतिशय जाणवणारा झाला आहे. अर्थात याची ओळख करून घ्यायला हवी व ती ओळख करून घेणे माणसाच्या जाणिवेबाहेरचे निश्चितच नाही. अर्थात हे लक्षात घेण्यासारखेच असल्यामुळे ते लक्षात घ्यायलाही हवेच! पण निव्वळ नियंत्रणाबाहेर जाणाऱ्या उपभोग घेत राहण्याच्या आकांक्षेमुळे हे शक्य होत नसावे. असेही म्हणता येऊ शकते. अर्थात यातूनच आकांक्षेचे शुद्धीकरण करीत राहण्याची गरज निर्माण होत असते व ती या वेळी सर्व मर्यादा मोडून काढत गतिमान झालेल्या जगात अतिशय जाणवणारी झालेली दिसतेच आहे! तेव्हा आकांक्षाशुद्धीची काहीएक प्रक्रिया व त्याची परिस्थिती असू शकते किंवा काय, हे जाणून घ्यायला हवे आहे.

**४ : विवेकभ्रष्टता**

माणूस आकांक्षेविना असूच शकत नाही. कारण तो आकांक्षेविना घडत नसतो व घडतही नाही. पण आकांक्षेची निश्चित अशी दिशा व त्याची दृष्टी असावयाला हवी व ती बाळगता यायलाही हवीच! पण मनाला आकर्षण वाटते यातूनच आकांक्षा निर्माण होत असल्यामुळे मनाला ज्याचे आकर्षण वाटते ते माणसाला उद्धरून नेणारे असू शकेल किंवा काय, याचा विवेक मनाच्या पातळीवर राहून सहसा करता येत नाही. कारण ते शक्य होतच नसते. म्हणून मनाच्या पातळीवर काहीही असू शकते. म्हणूनच त्या काहीतल्या एका कशालाही ज्याचे आकर्षण वाटते, ते विवेकाच्या आधाराने म्हणजे विवेकाचा निकष लावून पडताळून घ्यायचे असते. आकर्षणातल्या मनाचा कल हा जेव्हा ज्याचे आकर्षण वाटते तेच प्राप्त करण्याकडे जेव्हा होऊन बसतो, तेव्हा त्यातूनच विवेकाकडे दुर्लक्ष केले जाते. म्हणून माणसाच्या मनाच्या आकर्षणाला व त्याच्या कलाला माणसाचा विवेक

जेव्हा आवरू शकत नसल्याची स्थिती होत असते, तेव्हा मनाचे आकर्षण व त्याचा कल विवेकभ्रष्ट झाल्याचे म्हटले जाते. तेव्हा माणसाचे मन आणि माणसाचा विवेक या दोहोंत सामंजस्य असावे व ते निर्माण व्हावे याची जाणीव निर्माण व्हावी लागते व अर्थातच ती निर्माण करावीही लागते. या दृष्टीने कोणत्याही पण निश्चित अशा निष्कर्षाप्रत पोचायचेच असे ठरल्यास माणसाचे मन व माणसाचा विवेक या दोहोंत सामंजस्य निर्माण करण्याची जाणीव बाळगण्याची काहीएक प्रक्रिया असू शकते व तिचा अभ्यासही करावा लागतो. हे मान्य केल्यानेच मनाच्या आकर्षणाचा व विवेकाचा न उलगडणारा जो गुंता झालेला जाणवत राहतो, तो उलगडला जाऊ शकेल. अन्यथा जो गुंता झालेला आहे त्यातून माणसाला भ्रामक अवस्था प्राप्त होऊ शकते व याची तजवीज धर्मसंप्रदायांनी करून ठेवलेलीच असल्यामुळे यातून माणसाची व मनुष्यसमूहांची मुक्तता होत नाही. कारण धर्मसंप्रदायांनी जी तजवीज करून ठेवलेली आहे, ती माणूस त्यातून मुक्त होऊन बाहेर पडू नये अशा एका उपाययोजनेतलीच म्हणता येऊ शकते. कारण माणसाचा मुक्त जाणीवविकास व्हावा हे धर्मसंप्रदायांना अपेक्षितच नसल्यामुळे धर्मसंप्रदाय माणसाला भ्रमातच जगण्याला प्रवृत्त करत असतात, करत आलेही आहेत. यापुढेही हेच केले जाणार आहे. म्हणून धर्मसंप्रदायांच्या अनुशासनातच माणसाची जाणीव गोठवून ठेवली जात असते! यामुळे धर्मसंप्रदायांच्या अनुशासनात माणसाच्या मुक्त जाणीवविकासाला महत्त्व दिलेच जात नाही. आजवर ते महत्त्व दिले गेलेले नाही, हे स्पष्टच आहे.

**५ : अध्यात्म आणि विज्ञान या दोहोंमधला अनुबंध**

धर्मसंप्रदायांच्या अनुशासनातून माणसाची आकांक्षा-शुद्धी होण्याची शक्यताच नव्हती व नाही. कारण माणसाची आकांक्षाशुद्धी व्हावी हे धर्मसंप्रदायांना अपेक्षितच नसते. कारण धर्मसंप्रदायांच्या अनुशासनाने माणूस बांधला जावा व अनुशासनाची बंधने त्याने पाळावी हेच धर्मसंप्रदायांना अभिप्रेत व अपेक्षितही असल्यामुळे माणसाच्या मुक्त जाणीवविकासाला यामुळे संधीच उपलब्ध होत नाही! म्हणून माणसाचा जाणीवविकास होणे धर्मसंप्रदायांना नकोच असल्यामुळे मुक्त जाणीवविकासाची अपेक्षा धर्मसंप्रदायांकडून करणेच व्यर्थ आहे. तेव्हा माणसाचा मुक्त जाणीवविकास कसा होईल व तो व्हावयाला हवा की नको, असे काही प्रश्न स्वाभाविकपणेच उपस्थित होतात. मुक्त जाणीवविकासाचा उपाय करायला हवा, याची निकडही यातून दर्शविली जाते. ही निकड सरळ सरळ माणसाच्या संवेदनेशी निगडित आहे. कारण संवेदनेतच जाणिवेचा वास असतो. म्हणून ती अभिव्यक्त होऊ शकली किंवा अभिव्यक्त करता आली, तर जाणीवविकासाला संधी उपलब्ध होत असते. या ठिकाणी जाणीवविकास म्हणजे मुक्त जाणीव हेच अपेक्षित आहे. पण मुळात संवेदना असली तरीही ती अभिव्यक्त होत नसेल किंवा अभिव्यक्त करताच येत नसेल, तर त्यातून माणसाची जी अवस्था होत असते, त्यालाच बधिरता म्हणावयाचे असते. तेव्हा बधिरता ही माणसाची संवेदना अभिव्यक्त होत नसण्यातूनच माणसाला येत असते. हे लक्षात घेता येऊ शकले तरच संवेदनेच्या अभिव्यक्तीचा मार्ग मोकळा होऊ शकतो. तो तसा मोकळा झाला तरच मुक्त जाणीवविकासाची संधी उपलब्ध झाली, असे म्हणता येऊ शकते! पण संवेदनेची अभिव्यक्ती ज्यामुळे संभवत नसते, त्याची कारणे लक्षात घेता आल्यास संवेदनेच्या अभिव्यक्तीचा मार्ग ज्यामुळे अवरुद्ध झाला किंवा अवरुद्ध केला गेला, ते कळणे शक्य होऊ शकते. पण यासाठी बधिरता ज्यामुळे आली आहे किंवा येऊ शकते, त्याचा शोध लागायला हवा आहे. अर्थात माणसाला संवेदना असते व संवेदनेशिवाय माणसाचे अस्तित्व नसते, असे जर मानले तर माणसाला येणारी बधिरता हा एक मनावर जडलेला पापुद्रा आहे व तो कवचासारखा टणक झालेलाही असतो, हे कळण्याइतपत माणसात चैतन्य असते. या चैतन्याला योग्य दिशेने जाण्यासाठी जे अडथळे निर्माण होतात, ते दूर करता येऊ शकतात. अर्थात तो एक अभ्यास आहे व हा अभ्यास माणसाने करायलाही हवा! पण तो अभ्यास विशिष्ट कारणातून निर्माण झालेल्या विशिष्ट परिस्थितीमुळे थांबला आहे

किंवा थांबवला गेला आहे, असे साधार म्हणता येऊ शकते. या संदर्भात माणसाची आकांक्षा ज्या दिशेने जाण्यास वळलेली दिसते आहे किंवा गतिपूर्वकच पुढे जाताना दिसते आहे, त्याची ओळख करून घ्यायला हवी. म्हणून माणसाला गतिपूर्वकच पुढे जाण्याचा जो ध्यास लागलेला आहे, तो ध्यास उपभोगाच्या आकर्षणातला जर असला व हीच माणसाची आकांक्षा झालेली असली, तर यातून निर्माण झालेली परिस्थिती हीच विशिष्ट परिस्थिती म्हणता येऊ शकेल. तेव्हा उपभोगाच्या आकर्षणातून गतिपूर्वक पुढे जाण्याच्या माणसाच्या आकांक्षेत अशा एका थांब्यावर जाणेच भाग पडते आहे, की ज्यातून माणसाची संवेदनाच गोठून जाऊ शकते आहे. हिमालयातल्या कुलू-मनालीच्या बर्फात हिवाळ्यात माणूस उघड्याने गेलाच तर तो गोठून पुतळ्यासारखा निर्जीव होतो असे म्हणतात. तसेच माणसाची संवेदना गोठवून टाकणाऱ्या उपभोगाच्या आकर्षणातून ज्या एका थांब्यावर माणूस जाऊन पोचतो, त्या थांब्यावर तो गोठून गेलेलाच असेल, तर ते स्वाभाविकच म्हणायला हवे. कारण निसर्गतःच हे घडत आले आहे व घडत असते. पण गतिपूर्वक पुढे जाण्यालाच माणसाची श्रेष्ठता मानून त्याचेच 'प्रगती' असे नामकरण केले गेले आहे. यालाच प्रतिष्ठा प्राप्त करून दिली जाते आहे! अर्थात माणसाच्या प्रगतीचे अनेकानेक थांबे निर्माण केले जाण्याचे उपक्रम निर्माण करण्याची साधने उपलब्ध करून घेतली जाऊ लागली व ती विज्ञानाच्या (सायन्स) द्वारेच उपलब्ध केली जाऊ शकतात, असे मानलेही गेले. म्हणून वैज्ञानिक साधनांच्या द्वारे प्राप्त केल्या जाणाऱ्या प्रगतीलाच वैज्ञानिक प्रगती म्हटले जाऊ लागले. यात विज्ञान हे साधन मानले गेले आहे. पण ते उपकरणातून अस्तित्वात येत असते. म्हणून विज्ञानाच्या या उपकरणातही प्रगती होत राहावी लागते. म्हणजे यातून विज्ञानाची प्रगत उपकरणे प्राप्त केली जाऊ शकतात. अशा तऱ्हेने विज्ञानाच्या उपकरणांचीही प्रगती व्हावीच लागते. तेव्हा वैज्ञानिक साधने वैज्ञानिक उपकरणातूनच प्राप्त केली जातात. म्हणून माणसाच्या प्रगतीला वैज्ञानिक प्रगती म्हणणे यातूनच शक्य झाले. माणसाची पुढे जाण्याची गतिमानता ही अशा तऱ्हेने वैज्ञानिक साधनांद्वारे समृद्ध केली जाते. ती माणसाच्या व मनुष्यसमूहांच्या उद्धाराचीच उद्धारकर्ती म्हणून मान्यता पावली व प्रतिष्ठित केली गेली आहेत. पण उद्धार करणारी ही वैज्ञानिक साधने मात्र माणसाच्या आंतरिक चैतन्यातूनच निपजतात, ही वस्तुस्थिती या ठिकाणी लक्षात घ्यायला हवी. म्हणून माणसाच्या आंतरिक चैतन्याचा अभाव झाला तर वैज्ञानिक साधने निपजत नाहीत किंवा उपलब्ध होत नाहीत, हे स्पष्टच आहे. पण माणसाची आंतरिक चेतना किंवा चैतन्य हे साधन नाही; ती माणसाची स्फूर्ती (स्पिरिट) आहे. तेव्हा साधन आणि माणसाची स्फूर्ती या दोहोंतले अंतर वा या दोहोंतला फरक लक्षात घेण्यासाठी साधने ही स्वयंचलित नसतात व नाहीत, हेदेखील लक्षात घ्यायला हवे. चैतन्यातल्या स्फूर्तीतूनच ती चलित होतात, हे लक्षात घेणेही गरजेचे होऊन बसते. म्हणून माणसात चैतन्य असावे लागते. कारण त्यातूनच माणसाला स्फूर्ती लाभत असते. यातून जी स्थिती माणसाला प्राप्त होत असते, ती चैतन्यदायी व स्फूर्तिदायी असते. तरीही ती आत्मावलंबी असते. कारण माणसाचे चैतन्य व स्फूर्ती म्हणून ज्याला संबोधिले जाते, ते मुळात आत्म्यातले असते. अर्थात आत्मा हा अमूर्त आहे. म्हणून त्याचे उघड स्वरूप काही असते व असू शकते, असे मानले जात नाही. यामुळे आत्म्याचे अस्तित्वच नसते, असा एक सिद्धान्त मांडला गेला आहे. हा सिद्धान्त सर्वसामान्यपणे बौद्धमतात आढळून येतो. अनीश्वरवादामध्येही तो आढळून येतो. म्हणून, आत्म्याचे अस्तित्वच मानायचे नाही, अशी याची मांडणीही केली गेली आहे. पण हा एक वादविषय झाला आहे व तो मतावलंबीयांनी प्रतिष्ठेचा करून घेतल्यामुळे त्यावरून निश्चित अशा कोणत्याही निष्कर्षाप्रत जाता येणे शक्य होत नाही! पण माणसातले चैतन्य व स्फूर्ती या दोन्ही ज्यातून लाभतात त्याला आत्मा (स्पिरिट) संबोधिले जात असेल, तर तो वादविषय करून घेतला जाऊ नये. कारण शेवटी माणसात चैतन्य आहे व त्यातून त्याला स्फूर्ती लाभते, हे मान्य केले जात असेल, तर ते कशातून

येते हा प्रश्न शिल्लक उरतोच! याचे समाधानकारक उत्तर आत्म्याचे अस्तित्वच ज्यांना मान्य नाही ते देऊ शकत नाहीत, अशी एक वस्तुस्थिती झालेली आहे. म्हणून जो निराकार आहे त्याला जर आत्मा संबोधिले जात असेल, तर त्यावर आक्षेप घेण्यासारखे काही असू नये. कारण आत्मा हा 'प्राणतत्त्व' मानला जातो व त्याचे एक तत्त्वज्ञानही अस्तित्वात आले आहे व ते जगात सर्वत्र मान्यता पावलेले आहे. अशा स्थितीत 'आत्मशक्ती' ही 'परमात्माशक्ती' मानूनच ज्याचा उल्लेख केला जात असतो, तो नुसताच अनाठायी म्हणू नये हे लक्षात घ्यायला हवे. कारण जे 'आत्मा-परमात्मा' मानतच नाहीत, तेच त्याला निर्मितिक्षम वैश्विक शक्ती म्हणतात! तेव्हा आत्मा-परमात्मा किंवा वैश्विक निर्मिती शक्ती, असे काहीही जरी संबोधिले गेले तरी माणसातले चैतन्य व स्फूर्ती ज्यातून प्राप्त होते, त्याला परमात्म-शक्ती वा आत्मशक्ती संबोधूनच याच्या अभिव्यक्तीला 'अध्यात्म' (स्पिरिट) म्हटले गेले आहे. ते स्वीकारूनच विज्ञान वा वैज्ञानिक साधनांना माणसाच्या उद्धारासाठी उपयोगात आणण्यात अध्यात्माचे योगदान होत असल्याचे मान्य केले जाते व विज्ञान (सायन्स) हे अध्यात्माच्या नियंत्रणात असले तरच ते कोणत्याही काळी वा सर्वकाळी उपकारक व उद्धारक ठरू शकते व घातक ठरणार नाही, अशी याची एक तत्त्वज्ञानात्मक मांडणी केली गेली आहे. तेव्हा या दृष्टीने अध्यात्म आणि विज्ञान (सायन्स) या दोहोंच्या अनुबंधाचा विचार करणेच अपेक्षित धरायला हवे. अर्थातच याच्या वास्तविक स्वरूपाचे अवलोकन करून घ्यायला हवे आहे.

### ६ : अध्यात्म आणि विज्ञानामधले सख्यत्व

कोणत्याही परिस्थितीत विज्ञान अमान्य होण्यासारखे नसते; पण ते साधन आहे एवढे मात्र लक्षात घ्यायला हवे. माणसाची वा कोणतीही प्रगती साधण्यासाठी विज्ञान हे हवेच असते. पण प्रगती साधण्याचा हेतू व दृष्टिकोण वैज्ञानिक साधनांमुळेच साधता येत नाहीत; कारण ते शक्यच नसते. म्हणून प्रगतीचा हेतू व दृष्टिकोन स्पष्ट असला तरच विज्ञान व वैज्ञानिक साधने प्रगतीसाठी प्रयोजनकारी मानता येऊ शकतात व मानलीही जातात. पण प्रगतीचा हेतू व दृष्टिकोन स्पष्ट होत नसल्यामुळे विज्ञान व वैज्ञानिक साधने घातक ठरू शकतात व ठरलेली आहेत. अणूचा शोध आइन्स्टाइनने लावला. त्याचा शोध लावण्याचा हेतू विश्वाच्या कल्याणाचाच होता. पण युद्धासाठी अणुबॉम्ब निर्माण केले गेले व त्यातून विनाशाची परिस्थिती निर्माण झाली. जपानच्या हिरोशिमा व नागासाकीवर हे बॉम्ब जेव्हा टाकले गेले, तेव्हा मनुष्यसंहाराची व सर्वनाशाची वस्तुस्थिती जगाला कळली व जग हळहळत राहिले. अजूनही याच हळहळण्याचे स्मरण करण्यासाठीच जगात हिरोशिमा दिवस दरवर्षी पाळला जातो. तेव्हा अणूचा शोध जगाच्या कल्याणासाठीच जरी केला गेला असला, तरी माणसाचा वैचारिक व मानसिक समतोल साधण्याचा प्रश्न हा विकृत मानसिक अवस्थेतूनच निर्माण झाला. याचे विज्ञान व वैज्ञानिक साधनांच्या वतीने समाधानकारक उत्तर देता येणे शक्य झालेले नाही. म्हणून वैचारिक व मानसिक समतोल साधण्यासाठी माणसाच्या मनाला आध्यात्मिक पातळीवरच ठेवावे लागते. ही एक वैचारिक व मानसिक गरज मानून स्वीकारल्याशिवाय विज्ञान व वैज्ञानिक साधने जगाच्या हिताची ठरवता येत नाहीत, ही एक वस्तुस्थिती प्रत्ययाला येत असते व युद्धाच्या अनेक प्रसंगांतून ती आलेलीही आहे!

युद्धाशिवायचे असे अनेक प्रसंग आहेत, की ज्यांतून प्रगती साधल्याचे दर्शवले जाते व त्याचा प्रचार-प्रसारही मोठ्या प्रमाणात केला जातो. माणसाच्या गरजा पूर्ण करणे हा एक प्रगतीचा दृष्टिकोन मानला गेला आहे. पण माणसाच्याच मानल्या जातील अशा गरजांविषयी मतभिन्नता आहे. कारण ज्यांना गरजा म्हणून स्वीकारले जाते, त्यातून मनोविकार जडतात असा अनुभव आलेला आहे. प्रगती झाली असेच जर म्हटले जात असेल, तर मनोविकार जडायला नको आहेत. पण प्रगती जेव्हा गरजेतली नसते तेव्हा त्यातून जे निपजेल ते मनोविकृतीतलेच असू शकेल! म्हणून होत असलेल्या किंवा झालेल्या प्रगतीतून कशाला गरज म्हटले जाईल,

याची स्पष्टता होत नाही. हीच जर वस्तुस्थिती असेल, तर गरजा पूर्ण करण्याच्या प्रगती या संकल्पनेला निश्चित अर्थ प्रदान करून द्यायला हवा. तो प्रदान केलाच जात नाही. म्हणून प्रगती हा एक भ्रमच असावा, असे या प्रगतीचे स्वरूप घडताना दिसते आहे. अर्थात प्रगती आणि भ्रामक प्रगती असा एक फरक करूनच प्रगतीची यथायोग्य संकल्पना निश्चित करून घ्यायला हवी आहे. ती अद्याप करून घेता आलेली नाही. कारण यासाठी माणसाच्या गरजा म्हणजे नेमके काय, हे कळायला हवे आहे. उपभोगासाठी किंवा उपभोगाची वृत्ती शमवण्यासाठी किंवा शांत करण्यासाठी ज्या वस्तु-उत्पादनाची प्रगतीच्या नावाने कास धरली गेली आहे, ती वैज्ञानिक साधनांच्या द्वारे किंवा त्यातल्या तंत्रज्ञानाच्या द्वारे समृद्ध केली जात आहे. पण या व अशा उत्पादनांना गरजपूर्ती करण्याच्या दृष्टीने जे महत्त्व दिले जाते आहे, त्यातून नुसती गरजपूर्तीच होत नाही तर अनावश्यक गरजा वाढवून त्यात वृद्धीही केली जाते आहे. म्हणून आकांक्षापूर्तीचे समाधान मिळवताच येत नाही. कारण जर वाढत्या गरजांमुळे फक्त आकांक्षांत वृद्धी होत असेल, तर त्यांची पूर्तता करण्याचा असा कोणताही निश्चित काळ व निश्चित क्षण उपभोक्त्याच्या जीवनात येत नाही. म्हणून आकांक्षापूर्ती होत नसल्यामुळे गरजपूर्ती झाल्याचे समाधान मिळत नाही. यामुळे माणूस कायम असमाधानी होऊनच जगत असतो व या असमाधानातूनच आकांक्षापूर्तीची ओढ माणसाच्या मनाला लागून राहते. यातूनच अवैध मार्गाने जाण्याचे अरिष्ट माणूस स्वतःवर ओढवून घेतो. या अरिष्टातच गुन्हेगारीचा वास असल्यामुळे आकांक्षा-पूर्तीसाठी अवैध मार्ग स्वीकारण्याची दुर्बुद्धी त्याला होत असते. हेच गुन्हेगारीचे दुष्टचक्र निर्माण करण्यास कारणीभूत ठरत असते. म्हणूनच प्रगतीच्या नावाने वैज्ञानिक साधने वापरून जी उत्पादनपद्धती अस्तित्वात आणली जाते, ती माणसाच्या आकांक्षापूर्तीचे समाधान माणसाला देऊ शकत नसल्यामुळे असमाधानातच कायमस्वरूपी जगत राहण्याची एक परिस्थिती निर्माण होत असते व ती जगात सर्वत्र दिसूनही येते आहे!

यामुळे उपभोगाच्या आकांक्षेतून जी अनिष्टता येते, ती माणसाला भ्रामकतेत लोटणारी व म्हणूनच त्यातून माणसाला गुन्हेगारीच्या दुष्प्रवृत्तीकडे वळवणारी झाली आहे. यात हत्या, आत्महत्या करणे आदी प्रकारही गुन्हेगारीचेच म्हणायला हवेत. वैज्ञानिक तंत्रज्ञानाचा उत्पादनपद्धतीसाठी अनियंत्रित स्वरूपात वापर वा प्रयोग करण्याच्या अमर्याद कृतीतून हे घडत असल्यामुळे जर माणूस स्वतःचे माणूसपणा हरवून जात असेल, तर वैज्ञानिक तंत्रज्ञान वैज्ञानिक गुणवत्तेचेच आहे, हे कशासाठी म्हणावयाचे असते, असा प्रश्न उपस्थित होतो व तो उपस्थित झालाही आहे. म्हणून विकृत मनोवृत्ती निर्माण करण्यास वा घडवण्यास विज्ञान व वैज्ञानिक तंत्रज्ञानातली सर्वच उपकरणे कारणीभूत ठरत असतील, तर ते पुढेच जात राहण्याच्या गतिमानतेतलेच आहे, असे म्हणता येणार नाही, हेच शेवटी लक्षात घ्यायला हवे. याचा अर्थ विज्ञान सर्वस्वी टाकाऊच आहे, असे मात्र ठरवता येत नाही व ठरवूही नये. कारण जर विज्ञान अध्यात्माच्या मर्यादेत राहू शकणार असेल, तर अध्यात्माच्या अनुषंगानेच विज्ञान मानवीय हिताच्या संदर्भातच उपयोगी व उपकारक मानता येईल व मानायलाही हवे आहे! कारण निव्वळ अध्यात्मातून कर्मप्रवणता व कार्यप्रवणता नष्ट होण्याची शक्यता प्रतिपादिली जाते व यामुळे मानवी कर्तृत्वाला फुलण्याची शक्यताच नाहीशी होणे संभवते; ते टाळता येईल व टाळायलाही हवेच आहे. म्हणून अध्यात्म आणि विज्ञान या दोन्हींमध्ये सख्यभाव असावयाला हवा व तो निर्माण करता यायलाही हवा. यातूनच मनुष्यजीवनाची सार्थकता सिद्ध होऊ शकेल. कारण हीच या वेळची मानवीय गरज होऊन बसलेली आहे!

**७ : धर्म आणि विज्ञानात कर्तव्य-कर्मातला समन्वय हवा**

कर्तव्य करण्याच्या किंवा कर्तव्य-कर्म करीत राहण्याच्या प्रवृत्तीलाच खऱ्या अर्थाने 'धर्म' म्हटले गेले आहे. पण कर्तव्य-कर्म करणाऱ्यांचे पुढे जाऊन संप्रदाय अस्तित्वात आले वा आणले गेले. म्हणूनच धर्मसंप्रदायांचे अस्तित्व निर्माण झाले. धर्मसंप्रदायांनी कर्तव्य-कर्म

करण्याच्या सहजप्रवृत्तीवर आघात करून त्यातूनच कर्मकांड अस्तित्वात आणले. म्हणून कर्तव्य-कर्म हेच कर्मकांड होऊन बसले. पण कर्तव्य-कर्म व कर्मकांड या दोहोंत फरक आहे. कारण कर्तव्य-कर्म उत्स्फूर्तपणे माणूस करतो. कर्मकांडे मात्र धर्मसंप्रदायांनी निर्माण करून माणसावर त्यांचे अनुशासन लादण्यातूनच आचरली जातात. लादणुकीत उत्स्फूर्तपणा नसतो. म्हणून कर्तव्य-कर्म उत्स्फूर्ततेतून जसे केले जाते, तसे कर्मकांड केले जात नाही. म्हणून कर्मकांड पार पाडायला सांप्रदायिक मध्यस्थांची वा पुरोहितांचीच धर्मसंप्रदायांना आवश्यकता वाटली. यातून धर्मसंप्रदायांतलाच पुरोहितांचा वर्ग अस्तित्वात आणला गेला. या वर्गाने माणसाला उत्स्फूर्त कर्तव्य करण्यातून वेगळे काढले व अज्ञानमूलक कर्मकांडाकडे त्याला वळवले. यामुळेच धर्मसंप्रदाय स्थिर झाले व त्यांची अनावश्यक व घातक अंधश्रद्धेची परंपराही निर्माण झाली. तेव्हा धर्मसंप्रदायांच्या अंधश्रद्धेतल्या परंपरांनीच माणसाला कर्तव्य-कर्मापासून वंचित ठेवले व कर्तव्य-कर्म करण्यातल्या धर्माच्या जागी धर्मसंप्रदायांचा अंधश्रद्धेतला संगठित धर्म स्थापित केला. म्हणून माणसाच्या कर्तव्य-कर्माच्या पालनात जो मनुष्य-धर्म होता – ज्याचे गीतेने 'स्वधर्म' या नावानेच प्रतिपादन केले आहे, त्यातून अध्यात्माची अनुभूती माणसाला मिळत होती – त्यापासून फारकत घेऊन माणूस धर्मसंप्रदायांच्या कर्मकांडात अडकून पडला. यामुळे धर्मसंप्रदायांतून अध्यात्माची अनुभूती माणसाला मिळण्याची शक्यताच उरली नाही. म्हणून जेव्हा म्हटले जाते, की धर्मानेच माणसाला अध्यात्माकडे नेले, तेव्हा त्याचा अर्थ माणसाच्या कर्तव्य-कर्मातलाच तो धर्म असतो व असू शकतो. म्हणजे धर्मसंप्रदायांच्या कर्मकांडातला तो मुळातच नसतो. हे लक्षात घेऊनच धर्म आणि अध्यात्म या दोहोंच्या अनुबंधाविषयीं योग्य ती धारणा करून घ्यायला हवी आहे. म्हणून संघटित धर्माच्या अनुशासनपालनातून अध्यात्माकडे जाता येत नाही व अध्यात्मात शिरताही येत नाही, हेच लक्षात घ्यायचे असते.

कर्तव्य-कर्मातला धर्म अध्यात्माची अनुभूती माणसाला देत असतो व देत आलाही आहे. म्हणून कर्तव्य-कर्म करण्यात सहजता व सुलभता आणण्याच्या दृष्टीने विज्ञान (सायन्स) प्रेरक ठरत असते. म्हणून अध्यात्माची अनुभूती ही विज्ञानाल पूरक-पोषकच असते. अर्थात अध्यात्म व विज्ञानात समन्वय घडून आल्याने मनुष्यजीवनाच्या उद्धाराचा मार्ग मोकळा होतो. म्हणूनच अध्यात्म आणि विज्ञान या दोहोंचा समन्वय घडून येणे मनुष्यजीवनाच्या उद्धाराचेच मानायला हवे आहे. पण संघटित धर्मात अध्यात्म आहे असा चुकीचा समज करून घेऊन त्याचाच अनर्थकारी पायंडा पाडला गेला असल्यामुळे, हा अनर्थकारी पायंडा विज्ञानपोषक राहू शकला नाही व राहू शकणारही नाही, हे मात्र दृष्टिआड केले गेले आहे. यामुळे अकारणच धर्म विज्ञानविरोधी किंवा विज्ञान धर्मविरोधी असल्याचे भासवले जाऊन त्याचीच एक चुकीची धारणा करून घेतलेली दिसते आहे.

**उपसंहार :**

मुक्त मनाची घडण घडल्यानेच माणसाला व जगातल्या मनुष्यसमूहांना अपेक्षित असलेला उद्धार होऊ शकतो! हीच वर्तमानातली माणसाची व जगातल्या समस्त मानवीय समूहांची अपरिहार्य अशी गरज झालेली आहे. म्हणून पुढे जात राहण्याच्या प्रगतीची ही अपरिहार्य गरज मानायला हवी. या गरजेची पूर्तता अध्यात्म आणि विज्ञानाच्या समन्वयातूनच होऊ शकत असल्यामुळे अध्यात्म आणि विज्ञानाचे समन्वयकारी उद्धारक रूप घडून येणे अपरिहार्य मानायला हवे. हे साधण्याचे कर्तृत्व निपजले व नियोजिले गेले, तरच गुन्हेगारीच्या दुर्वर्तनाला संधी उपलब्ध होणार नाही व जगातल्या गुन्हेगारीला आळाही बसेल. अर्थात गुन्हेगारी नियंत्रणात येऊन कालांतराने ती नाहीशीही होऊ शकेल अशी अपेक्षा करता येऊ शकते! तात्पर्य असे, की गुन्हेगारीने जग विव्हळते आहे, ते थांबवण्याचे श्रेय घ्यायला हवे!

ঞঞঞ

# पुष्पिका

स्मिता लाळे

कळीचं फूल होताना आपण नेहमीच बघतो पण फुलाची कळी होताना बघायला मिळाली तर? कुठे घडतं हे आश्चर्य? तर ते घडतं पुस्तकाच्या पाठपृष्ठावर.

मुखपृष्ठ, त्यावरील चित्र, पुस्तकाचं नाव यांवरून पुस्तकाच्या विषयाची थोडीशी कल्पना येते. मात्र त्या पुस्तकाची स्पष्ट कल्पना पुस्तक उलटं करून बघितल्या-वरच येते. ब्लर्ब, पाठपृष्ठ मजकूर तो इथे असतो. तो वाचला की पुस्तकाचं अंतरंग कळतं. रंग, रेषा, ठिपके यांमधून मुखपृष्ठ आपल्याशी बोलतं; पण ही भाषा सगळ्यांनाच कळते असं नाही. पाठपृष्ठ मात्र आपल्याशी शब्दांतूनच थेट संवाद साधतं. या कळीदार कपुरी पानात आतल्या फुलाचे रंग, त्याचा आकार, त्यातील स्पंदनं दिसतात.

जेव्हा इंग्लिश पुस्तकं वाचण्यात-बघण्यात येऊ लागली, तेव्हा रसिक वाचकांच्या, प्रकाशकांच्या लक्षात येऊ लागलं या ब्लर्बचं महत्त्व. पाठपृष्ठ मजकुरात संक्षिप्त स्वरूपात लेखकाबद्दल माहिती आणि पुस्तकाचा विषय लिहावा. काही लेखकांना कळलं की ब्लर्ब थोडं काव्यात्म, आलंकारिक, लयदार लिहिलं तर वाचकाला पुस्तकाचं आकर्षण वाटेल; पुस्तक वाचावंसं वाटेल. मग अतिशयोक्त लयदार ब्लर्ब अवतरले.

दभिसरांनीही पुस्तकांना दिलेले ब्लर्ब्स वाचायला मिळाले. ती पुस्तकंही वाचली. समीक्षा, कथा, कादंबरी, कवितासंग्रह, ललितलेखसंग्रह या सर्वप्रकारच्या पुस्तकांना सरांनी लिहिलेला पाठपृष्ठ मजकूर–एका अर्थानं केलेली पाठराखण बघितली. डॉ. श्री. व्यं. केतकर यांच्या कादंबऱ्यांपासून ते जीएंच्या कथासंग्रहांना सरांचे ब्लर्ब्स आहेत.

मनोहर शहाणे 'अमृत' मासिकाचे संपादक म्हणून सर्वांना परिचित आहेत. अलीकडेच त्यांचा 'उद्या' हा कथासंग्रह पद्मगंधा प्रकाशनाने प्रकाशित केला आहे. त्याला सरांनी ब्लर्ब दिले आहे. कथा वाचून सरांना काय जाणवले, ते इथे खूपच काव्यमय पण अचूक भाषेत व्यक्त झाले आहे. ही काही लयदार अतिशयोक्ती नाही; ही सूत्ररूप समीक्षाच आहे. या ब्लर्बच्या सुरुवातीच्या भागात सर म्हणतात,

जाणीव आणि नेणीव  
यांच्यामधे जो एक धूसर पट्टा असतो  
तिथे आसन घालून  
मनोहर शहाणे हा कथावंत  
कथानिर्मिती करीत असतो.  
—कथानुभवापासून लेखक  
अचूक अदूर राहतो  
ना दूर ना समीप

कथाकाराची कल्पनेची झेप आणि निवेदनाची शैली सरांनी इथे नेमकेपणाने हेरली. मनोहर शहाणे यांच्या कथेतली सगळी वैशिष्ट्ये या ब्लर्बमधे एकवटली.

'निळासांवळा' – जीएंचा पहिला कथासंग्रह. या कथासंग्रहाला सरांनी ब्लर्ब लिहिले. ब्लर्बमध्ये या कथासंग्रहातील कथांना सरांनी फिरत्या केंद्राच्या कथा म्हटले आहे. फिरत्या केंद्राची कथा हा नवीनच वाक्प्रचार सरांनी इथे योजिला आहे. काहीतरी नवीनच शब्दयोजना करायची, नवीनच परिभाषा रूढ करायची या सोसातून नव्हे; तर सरांच्या वाङ्मयीन आकलनातून आणि प्रतीतीतून असे शब्द सरांना स्फुरतात. कथा एककेंद्री, कादंबरी अनेककेंद्री असते हे मराठी वाचकांना माहीत होते; पण 'फिरते केंद्र' हे अचूक विशेषण नव्या समीक्षकांना गवसले.

सरांचे ब्लर्ब्स हे एका समीक्षकाने लिहिलेले ब्लर्ब्स. त्यामुळे त्यांमध्ये त्या पुस्तकाची लघुसमीक्षाच असते. त्यात थोडं त्या लेखकासंबंधी, थोडं पुस्तकासंबंधी, लेखकाच्य लेखनशैलीसंबंधी येतंच: पण सरांच्याही लेखनशैलीचं, काव्यात्मतेचं, सूक्ष्मतेचं दर्शन त्यात घडतं. त्यात असते वाङ्मयीन कसोटी आणि आविष्काराची सचोटीही. ते पुस्तक जेव्हा आपण वाचतो, तेव्हा या सगळ्या गोष्टींचा

एकमेळ सरांना कसा साधला, याचं आपण आश्चर्य करत राहतो. पुस्तकातल्या व्यक्तिरेखांचं, त्यातल्या लेखांचं, त्यात उमटलेल्या भावनांचं समर्पक चित्रण फक्त आठ-दहा ओळींत होत जातं. एक आशयघन कविताच आपल्यासमोर आलेली असते. तिची मांडणीही तशीच कवितेसारखी आणि त्याखाली सरांची चढती नक्षीदार सही.

मला फार उत्सुकता होती, या अशा प्रकारच्या ब्लर्बची निर्मिती नेमकी कशी होते? सरांशी बोलले. लक्षात आलं, सर पुस्तक बारकाईनं वाचतात. मग तो कथासंग्रह असो, कवितासंग्रह की ललितलेखसंग्रह. बऱ्याच वेळा सरांकडे पुस्तकाला प्रस्तावना देण्यासंबंधी विचारणा होते. सर मात्र ब्लर्ब देण्यासाठी उत्सुक असतात. ते त्यांना जास्त आव्हानात्मक वाटत असावं.

नितीन लाळे यांच्या 'देवभूमी : अंदमान' (अभिनंदन प्रकाशन, कोल्हापूर) या पुस्तकाच्या वाचनाच्या वेळी ही ब्लर्बनिर्मिती अक्षरशः अनुभवली. सरांना नितीन हस्तलिखित वाचून दाखवत होते. सर अगदी मनापासून ऐकत होते. ऐकत काय होते? प्रतिभाशक्तीने अंदमान अनुभवत होते! आणि अचानक म्हणाले, 'थांब, मी ब्लर्ब देतो.' क्षणभर स्वस्थ झाले. अंगठा आणि चाफेकळीच्या चिमटीत दोन भुवयांच्या मधला भाग पकडला, डोळे बंद, चित्त एकाग्र. जणूकाही अंदमान आत्ता प्रतिमारूपाने त्यांच्यासमोर आणि त्याचं प्रतिबिंब ब्लर्बमध्ये. ते सांगत होते–

अनुभव आणि अनुभूती,  
ज्ञाननिष्ठा आणि देशनिष्ठा  
यांच्या एकमेळातून  
'देवभूमी :अंदमान'  
हे ग्रंथरूपी बेट वर आले आहे.  
अंदमानाप्रमाणेच हे ग्रंथबेट  
जीवनप्रीतीने हिरवेगार आणि  
ज्ञानप्रीतीने कणखर झाले आहे.

असा हा समीक्षारूप होऊन आलेलं ब्लर्ब. असं हे स्फुरलेलं ब्लर्ब. भावपूर्ण.

त्यासंबंधी आधी कुठलाही विचार नाही, कल्पना नाही, काही नाही. सरांना समीक्षा जशी स्फुरते, तसंच ब्लर्बही स्फुरतं. प्रस्तावनेसंबंधी विचारणा होत असूनही त्यांना ब्लर्बच का लिहावेसे वाटतात? आश्चर्यच आहे नाही? खरं म्हणजे प्रस्तावनेत खूप विस्ताराने पुस्तकाबद्दल, लेखकाबद्दल, त्याच्या लेखनशैलीबद्दल लिहिता येतं, समीक्षा करता येते. मग छोट्याशा ब्लर्बवरच का सरांचं शिक्कामोर्तब? यावर सरांचं मत जाणून घ्यायचं होतं. आजपर्यंत सरांनी पुष्कळ पुस्तकं आणि त्यांचे ब्लर्ब वाचले. त्यात कुठेही सुसंगती, आकर्षकता, डौलदारपणा आढळला नाही. काव्यात्मता तर नाहीच नाही. सरांना प्रकर्षाने वाटायला लागलं, की हे बदललं पाहिजे; प्रतिभावान लेखकाचं वाङ्मयीन स्थान अधिकारवाणीनं सांगितलं गेलं पाहिजे. ब्लर्बमधे ते अधोरेखित झालं पाहिजे. नवीन हस्तलिखितं प्रस्तावनेसाठी येतच होती. प्रस्तावना नकोच, त्यापेक्षा ब्लर्बच लिहावं असं सरांच्या मनात यायला लागलं. नव्हे, त्याच ओळी, तोच फॉर्म मनात रुंजी घालू लागला. ही ब्लर्ब्स वाचताना सुनीत किंवा दशपदी या काव्यप्रकारांची आठवण होते. या सुनीत किंवा दशपदीमधील सुबकता, बांधेसूदपणा सरांच्या ब्लर्बमधे दिसतो. हे दोन्ही प्रकार आता मराठीत चांगलेच रुळले आहेत. सरांचे असे काव्यमय ब्लर्ब्स वाचून असं वाटायला लागलं आहे, की असे ब्लर्ब्स स्वतंत्र वाङ्मयप्रकार म्हणून ओळखले जातील.

सरांनी श्री. व्यं. केतकरांच्या सात कादंबऱ्यांना ब्लर्ब दिले. या सातही कादंबऱ्यांचे विषय अर्थातच वेगवेगळे. त्या सात कादंबऱ्यांचे पाठपृष्ठ मजकूर वैशिष्ट्यपूर्ण आहेत. या सर्व मजकुरांचे पहिले पॅरेग्राफ्स एकसारखेच आहेत. यात श्री. व्यं. केतकर यांचं व्यक्तिमत्त्व व वाङ्मयीन स्थान अधोरेखित झालं आहे. दुसऱ्या पॅरेग्राफमध्ये मात्र प्रत्येक कादंबरीचं वैशिष्ट्य ठसवलं गेलं आहे. या सात कादंबऱ्यांपैकी 'गोंडवनातील प्रियंवदा' या कादंबरीला सरांनी ब्लर्ब दिला तो असा :

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर  
हा मराठी ज्ञानक्षेत्राचा मानबिंदू आहे; मानदंडही आहे.  
का नसावा?  
त्यांनी ज्ञानकोशाच्या तेहतीस खंडांनी ज्ञानसागराचे मंथन करून  
महाराष्ट्राच्या करतलावर अमृताचा नैवेद्य ठेवला;









त्यांनी समाजशास्त्रीय दृष्टीने
मराठी संस्कृती आणि मराठी साहित्य यांचा वेध घेतला;
त्यांनी वेलीसारख्या वेटोळे घालून बसलेल्या मराठी
कादंबरीला घनदाट अरण्याचे रूप दिले.
'मीच हे सांगितले पाहिजे' अशा स्वभावाचे शेजवलकर,
श्रीकेक्षी आणि दुर्गाबाई यांना त्यांनी मोहित केले.
'गोंडवनातील प्रियंवदा'
ही त्यांची १९२६ ची कादंबरी. समाजशास्त्रीय.
'घरकुट्टे घराण्याचा इतिहास' असा जोडमथळा असलेल्या
या कादंबरीतील बिंबा म्हणते, "राष्ट्र म्हणजे बायका.
पुरुष नव्हे."
ही कादंबरीकाराचीच भूमिका;
ती आजच्या समाजाने काळजात आणि कपाटात जपली
पाहिजे.

अलीकडेच ह. ल. निपुणगे यांच्या 'हलचल' या आत्मचरित्रालाही सरांचाच पाठपृष्ठ मजकूर पुस्तकातल्या सगळ्या वैशिष्ट्यांसकट आणि हलंच्या व्यक्तिमत्त्वासकट आला आहे. गोव्याची कवयित्री डॉ. अनुजा जोशी हिच्या 'उत्सव' या कवितासंग्रहालाही सरांचीच पाठराखण. ते लिहितात–

पेशाने डॉक्टर असलेली
अनुजा
एरव्ही इतकी
लोभस कविता करती?
जैविक अनुभवाशी
सौंदर्यानुभूतीचे नाते
विपरीत असते!

समीक्षेच्या वाटेवर सर इतके रुळले आहेत, की ते सहजच एवढ्या छोट्या वाटेवरून ऐटीत, रुबाबात तोल न जाता लिहू शकतात. सरांसारखा ललितांगी समीक्षकच असं लिहू शकतो. म्हणून तर ते ब्लर्ब्स डौलदार, घाटदार आणि समतोल होतात. ती एक संक्षिप्त समीक्षाच होते. पुन्हा पुन्हा वाचल्यावर त्यातलं भावकाव्य उलगडत जातं. शब्दांतलं नेमकेपण लक्षात येतं.

काही वर्षांपूर्वी दैनिक लोकसत्तानेही 'ब्लर्ब' या लेखनप्रकाराचं महत्त्व ओळखलं आणि चांगल्या ब्लर्ब्सला प्रसिद्धीही दिली. काही दिवस सदररूपाने काही लेखकांचे ब्लर्ब्स वाचकांच्या समोर ठेवले. त्यामुळे वाचकांचं, लेखकांचं, प्रकाशकांचं त्याकडे लक्ष गेलं. ब्लर्बचं वाङ्मयीन महत्त्व लक्षात आलं. सरांसारख्या प्रतिभावान लेखकाकडून ब्लर्ब लिहून घेण्यासाठी लेखक, प्रकाशक, कवी जास्त येऊ लागले. अर्थात सरांना ते पुस्तक वाचून तसं ब्लर्ब स्फुरलं पाहिजे. त्यासाठी मुळात त्या पुस्तकात तशी ताकद पाहिजे. नाहीतर सरांकडे नो कॉम्प्रमाइज. याचं मुख्य कारण म्हणजे सरांच्या लिहिण्यात कुठलाही व्यावसायिक हेतू नाही. ब्लर्बच्या आठ-दहा ओळी खरडल्या आणि घेतला मोबदला, अशी वृत्तीच नाही. कदाचित म्हणूनच उत्कटता, सहजता, तन्मयता या सर्व सिद्धी हात जोडून सरांच्य समोर उभ्या असतात. ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकाला हे का जमू नये?

खरंच, केव्हापासून सुरुवात झाली असेल असे ब्लर्ब लिहिण्याची? पहिल्यांदा कुणी लिहिले असेल ब्लर्ब? सरांना विचारलं; आणि काय सांगू तुम्हाला? याचंही मूळ चक्क श्रीज्ञानेश्वरीतच सापडलं. असं 'ब्लर्ब' ज्ञानेश्वरीच्या शेवटी आहे. ओवीबद्ध. ज्ञानेश्वर महाराजांचे लेखनिक श्री सच्चिदानंदबाबांनी ते लिहिले आहे. त्या वेळी स्वतः लेखक किंवा त्यांचे लेखनिक ब्लर्ब लिहीत. काही वेळा मूळ ग्रंथाला असा ब्लर्ब नसे; पण त्यानंतर पाठशुद्ध प्रतीला मात्र तो संपादक किंवा संशोधक ब्लर्ब लिहीत असे. त्या काळी त्याला ब्लर्ब नाही; पुष्पिका म्हणत. तर ज्ञानेश्वरीच्या शेवटी सच्चिदानंदबाबांची पुष्पिका अशी,

शके बाराशतें बारोत्तरें । तै टीका केली ज्ञानेश्वरें।
सच्चिदानंदबाबा आदरे । लेखकु जाहला।।

ज्ञानेश्वरीतल्या साडेतीन चरणांच्या ओव्यांना साजेशी ही साडेतीन चरणी पुष्पिका.

त्याखाली एकनाथ महाराजांनीही पुष्पिका लिहिली आहे. स्वहस्ते शुद्ध केलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रतीत शेवटी ते लिहितात,

ज्ञानेश्वरी पाठी । जो ओवी घालील मराठी ।
तेणे अमृताचे ताटी । जाण नरोटी । ठेविली ।।

नाथांनी पाठशुद्धीचे कार्य केले 'शके पंधराशे साहोत्तरी', तेव्हा त्यांना कुठे माहीत होते की –

नमो ज्ञानेश्वरा निष्कलंका ।








जयाची गीतेची वाचितां टीका ।
ज्ञान होय लोकां। अतिभाविकां ।
ग्रंथाचिया ।।

— अशी 'पुष्पिका' (कालोफोन) लिहून आपण भावी समीक्षकांची पाठराखण करीत आहोत म्हणून? एका सुबक (क्यूट) साहित्यप्रकारास जन्म देत आहोत म्हणून?

(टीपः येत्या जानेवारीस साहित्यसंमेलन होत आहे. त्या निमित्ताने माजी साहित्यसंमेलनाध्यक्ष डॉ. द. भि. कुलकर्णी सरांवर ढवळे प्रकाशनतर्फे दभि : सप्तपर्णी स्त्रीसंवेदन (संपादक : स्मिता लाळे) हे पुस्तक प्रकाशित होत आहे. वरील लेख या पुस्तकातून घेतला आहे.)

ଔଔଔ

# शिक्षणाचे व्यापारीकरण

एच. व्ही. देशपांडे

जिथे सरकारी अनुदान आहे तिथे गुणवत्ता नाही आणि जिथे गुणवत्ता आहे तिथे सरकारी अनुदान नाही, अशी स्थिती आहे. ज्या खासगी शिक्षणसंस्था गुणवत्तापूर्ण शिक्षण देतात, तिथे व्यापारीकरण होताना दिसते आणि जिथे सरकारी अनुदान आहे तिथे शिक्षण तुलनेने खूप स्वस्तात मिळते. गुणवत्तापूर्ण शिक्षण सर्वांना स्वस्तात मिळण्याचा कोणताही मार्ग आजच्या शिक्षण-व्यवस्थेत उपलब्ध नाही.

जागतिक व्यापार संघटनेच्या (WTO) सदस्य देशांनी १९९६ साली 'गॅट्स' करारावर सह्या केल्या. भारत या संघटनेच्या संस्थापक देशांपैकी एक असल्यामुळे भारतानेही गॅट्स करारावर सही केली. तेव्हापासून व्यापार आणि सेवा (यात शिक्षण देण्याच्या सेवेचा समावेश आहे) या क्षेत्रात परदेशी गुंतवणूक आपल्या देशात सुरू झाली. हीच आपल्या भारतीय जीवनमूल्यांच्या ऐवजी व्यापारी मूल्ये आपल्या समाजात प्रसारित होण्याची सुरुवात म्हणता येईल. आजपर्यंत आपण 'ज्ञानासारखे पवित्र काही नाही' यावर दृढ विश्वास ठेवून वाटचाल करीत आलो. पण आता मात्र ज्ञान ही जागतिक आणि देशांतर्गत बाजारपेठेतील एक 'विकाऊ वस्तू' (a commodity to be sold in the market) आहे, यावर विश्वास ठेवून आपण आपली वाटचाल सुरू केलेली आहे. शिक्षणसंस्था आता पवित्र क्षेत्रे राहिलेली नसून त्या ज्ञानाचा पुरवठा करणारी 'सेवाकेंद्रे' (service providers) झाली असून विद्यार्थी हे त्या केंद्रांत जाणारे 'ग्राहक' झाले आहेत.

विज्ञान-तंत्रज्ञानातील क्रांतीमुळे गेल्या २० वर्षांत काही कर्तबगार तंत्रज्ञ व्यक्ती/संस्था आणि त्यांचा उपयोग करून घेणाऱ्या व्यापाऱ्यांकडे अमाप पैसा येऊ लागला. आपली तरुण पिढी अमेरिकेतून लक्षावधी डॉलर्स भारतात पाठवू लागली. त्यामुळे इथल्या वस्तूंच्या विक्रीमूल्यात कृत्रिम वाढ झाली. ज्या घराच्या निर्मितीसाठी १० लाख रुपये प्रत्यक्ष खर्च येत होता, त्या घराची किंमत १५, २०, २५, ३० लाख रु. अशी वाढू लागली. हळूहळू सर्वच वस्तूंच्या किंमती वाढू लागल्या. त्यातून व्यापारी मानसिकता-पैसा आणि पैशातून सत्ता अशी 'व्यवहारी' जीवनशैली सुरू झाली. आज आपण पाश्चात्त्यांच्या आर्थिक साम्राज्यवादाचे बळी ठरत आहोत. त्यातूनच त्यांचा संस्कृतिक साम्राज्यवादही इथे प्रसारित होत आहे. हे अमेरिकन संस्कृतीचे जागतिकीकरण आहे (Globalization of American culture). यात अतिरिक्त पैशाची नफ्यासाठी गुंतवणूक हे तत्त्व महत्त्वाचे ठरले आहे. याच तत्त्वानुसार शिक्षण क्षेत्रात खासगी नफेखोरी घुसलेली आज आपण पाहतो आहोत. थोडक्यात, 'गॅट्स' करार आणि खूप वेगाने विकसित होणारे विज्ञान-तंत्रज्ञान यांचा परिणाम म्हणून आपल्या जीवनाच्या सर्वच अंगांमध्ये व्यापारीकरणाची वृत्ती बळावत चालली आहे; आणि ती अपरिहार्यपणे शिक्षण क्षेत्रात आली आहे.

आपल्या शिक्षण व्यवस्थेत एकूण सर्वसामान्यपणे पाच स्तर आहेत. १) बालवाडी/ KG; २)प्राथमिक; ३) माध्यमिक; ४) उच्च माध्यमिक आणि ५) उच्च शिक्षण (पदवी आणि पदव्युत्तर शिक्षण आणि संशोधन). यामध्ये नेमकेपणाने कुठेकुठे व्यापारीकरण झाले आहे आणि कुठेकुठे ते झालेले नाही, हे पाहून त्यामागची कारणेही तपासून पाहणे आवश्यक आहे. हा विचार करीत असताना ग्रामीण भाग आणि शहरी भाग अशा दोन्ही स्तरांचा विचार करावा लागेल.

गामीण भागात बालवाडी, अंगणवाडी अशा स्वरूपाचे जे शिक्षण सुरू आहे, ते मुख्यत्वे जिल्हा परिषदांच्या माध्यमातून म्हणजेच सरकारी अनुदानातून

अनुक्रमणिका

सुरू आहे. साहजिकच इथे शिक्षणाचे व्यापारीकरण झालेले नाही. इथे (ग्रामीण भागात) अंगणवाडीत प्रवेश मिळवणे सहजसोपे आहे. मात्र आता तालुकास्तरावरही इंग्रजी माध्यमाच्या शाळा सुरू होत आहेत. त्यांच्या KG Classes मध्ये प्रवेशासाठी काही रक्कम मोजावी लागते; कारण या शाळा/वर्ग खासगी संस्थांमार्फत चालविले जातात आणि त्यांना सरकारी अनुदान नसते. शहरी भागात आज सरकारी अनुदानावर चालणाऱ्या बालवाड्या जवळजवळ नाहीत. ज्या आहेत त्या नगण्य प्रमाणात आहेत. म्हणजे शहरांमधून ज्या खासगी संस्थांच्या बालवाड्या/KG Classes सुरू आहेत (त्यांत मराठी आणि इंग्रजी माध्यमांचाही समावेश आहे), त्यात लहान मुलामुलींना प्रवेश घेताना लक्षणीय रक्कम मोजावी लागते; ती देऊनही प्रवेशासाठी अन्य खटपटी कराव्या लागतात. कारण इथे मागणी खूप आणि शाळांची संख्या मर्यादित असे व्यस्त प्रमाण आहे. अशा खासगी संस्थांचा खर्चही लक्षात घेणे आवश्यक आहे. पण हा खर्च लक्षात घेऊनही द्यावी लागणारी रक्कम अधिक असते, असा आपला अनुभव आहे. परंतु ग्रामीण भागातील अंगणवाड्या (सरकारी अनुदानित) आणि शहरी भागातील KG Classes यांच्यातील साधनसामग्री, शिक्षक आणि शिक्षणाची गुणवत्ता यांतील फरकही लक्षणीय आहे, हेही विसरून चालणार नाही.

जी गोष्ट बालवाडी स्तरावरील शिक्षणाची, तीच गोष्ट सर्वसामान्यपणे प्राथमिक शिक्षणाची. याही स्तरावर ग्रामीण आणि शहरी भागात आपल्याला अनुक्रमे कमी खर्चाचे आणि जास्त खर्चाचे शिक्षण असा फरक दिसतो. इथेही जिल्हा परिषदेच्या आणि नगरपालिकेच्या प्राथमिक शाळा आणि खासगी शिक्षण संस्थांच्या प्राथमिक शाळा यांत गुणवत्तेचा फरक दिसतो.

माध्यमिक आणि उच्च माध्यमिक या दोन्ही स्तरांवरील ग्रामीण आणि शहरी भागांत शैक्षणिक खर्चाच्या संदर्भात हीच स्थिती आहे. ज्या माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शाळांना सरकारी अनुदान मिळते, तिथे शैक्षाणिक शुल्क कमी आहे; आणि ज्या खासगी शाळांना अनुदान मिळत नाही, तिथे शुल्क जास्त असते. विशेषतः CBSC किंवा इंग्रजी माध्यमाच्या खासगी (विनाअनुदानित शाळांमध्ये) प्रवेश घेणे खूप खर्चाचे तर आहेच; पण तिथे जागा कमी आणि प्रवेशअर्जांची संख्या खूप असल्याने इतरही 'खटपटी' कराव्या लागतात. या परिस्थितीत राजकीय पक्षांचे स्थानिक 'कार्यकर्ते' त्यांच्या पद्धतीने (Style ने) कार्यरत असतात; आणि इथेही 'व्यापार' हा घटक प्रभावी असतो. शिक्षणाच्या व्यापारीकरणाची ही राजकीय बाजू पुढे उच्च शिक्षणात अधिक सभ्यतेच्या बुरख्याखाली कार्यरत असते. काही खासगी संस्था आपल्या अत्याधुनिक इंग्रजी माध्यमांच्या शाळा शहरांपासून थोडे दूर निसर्गरम्य परिसरात चालवीत असतात. विद्यार्थ्यांच्या राहण्या-जेवणाच्या सर्व सोयी तिथे चांगल्या प्रकारे उपलब्ध करून दिलेल्या असतात. अशा निवासी शाळांमधील प्रवेश व सोयी-सवलतींसाठी विद्यार्थ्यांच्या पालकांना मोठी रक्कम मोजावी लागते; पण अशा शाळांमधील शिक्षण आणि शिस्त यांची गुणवत्ताही उल्लेखनीय अशी असते. या प्रकारांत एक वेगळेपण जपले आहे, ते जैन धर्मीयांच्या निवासी पाठशाळांनी. या शाळा जैन धर्मीयांच्या मोठ्या तीर्थक्षेत्रांत धार्मिक वातावरणात शैक्षणिक कार्य निष्ठेने करीत असतात. खासगी (विनाअनुदानित) निसर्गरम्य परिसरातील इंग्रजी माध्यमांच्या शाळांतील महागडे शिक्षण सर्वसामान्यांच्या आवाक्याबाहेरचे असते. महाराष्ट्रातील अशा प्रसिद्ध शाळांमधील एका विद्यार्थ्याचा वार्षिक खर्च शाळेच्या व इयत्तेच्या प्रकारानुसार एक लाखापासून पाच लाखांपर्यंत व मुंबईतील परदेशी संस्थांच्या शाळांच्या संदर्भात त्याहीपेक्षा कितीतरी जास्त आहे. ग्रामीण किंवा शहरी भागातील सरकारी अनुदानित माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शाळा आणि या खासगी खर्चिक शाळा यांतील गुणवत्तेचा फरक हेही चित्र आपल्यासमोर आहे.

शहरी आणि ग्रामीण, सरकारी आणि खासगी अनुदानित आणि विनाअनुदानित शिक्षणसंस्थांमध्ये शैक्षणिक गुणवत्तेतील फरक/तफावत खूप मोठी असून आपल्या भारतीय शिक्षणप्रणालीतील तो एक आपणा सर्वांच्या चिंतेचा आणि चिंतनाचा विषय झाला आहे. सर्वांना परवडेल असे समान गुणवत्तेचे शिक्षण देणारी पद्धत आपण निर्माण करू शकलो नाही आणि नजीकच्या काळात ती करता येईल, याची सुतराम शक्यता नाही.

उच्च शिक्षणातही सर्वसामान्यपणे हीच स्थिती आहे.

कला, वाणिज्य आणि विज्ञान विभागातील महाविद्यालयांची आणि त्यांतील विद्यार्थ्यांची संख्या खूप मोठी आहे. त्यांचे प्रमाण (त्या त्या प्रकारात) ८०% पेक्षा जास्त आहे. ही महाविद्यालये बहुतांशी अनुदानित असल्यामुळे तिथे शिक्षणाचा खर्च फारसा नाही. B.Ed, MBA, Computer आणि Law यांतील शिक्षणही पूर्वीप्रमाणे फार महागडे राहिलेले नाही. याचे कारण या स्वरूपाच्या शैक्षणिक संस्था नफ्यात चालत होत्या म्हणून त्यांची संख्या झपाट्याने वाढत गेली; आणि त्यातून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना पूर्वीइतकी नोकरीची खात्री राहिलेली नाही. सुमारे १० वर्षांपूर्वी अभियांत्रिकी महाविद्यालयांची (Engineering colleges) संख्या आजच्या त्यांच्या संख्येच्या तुलनेत कमी होती. तेव्हा या क्षेत्रात नोकरीची हमी जास्त असल्याने या शिक्षणाकडे विद्यार्थ्यांचा ओढा होता. म्हणून त्या वेळी हे शिक्षण खूप महागडे होते. आज बऱ्याच अभियांत्रिकी महाविद्यालयांत प्रवेश घेणारे विद्यार्थी पुरेशा प्रमाणात उपलब्धच नसल्याने तिथे बऱ्याच जागा रिकाम्या आहेत.

उच्च शिक्षणात अशी काही व्यावसायिक क्षेत्रे आहेत, की तिथे शिक्षण घेतल्यानंतर पुढे खूप कमाई करता येते. उदा., वैद्यकीय शिक्षण. त्यातही आयुर्वेदापेक्षा MBBS/M.S/M.D इ. तसेच IITS and IIMS यांसारख्या नामवंत शैक्षणिक संस्थांमधील शिक्षण. अशा संस्थांमध्ये जागा खूपच कमी पण प्रवेशअर्जांची संख्या खूप मोठी अशी स्थिती आहे. सन २००८ मध्ये भारतातील IIM (Indian Institutes of Management) मधील एकूण जागा १७०० होत्या; आणि त्यासाठी एकूण २ लाख ७० हजार अर्ज आलेले होते. सन २००९ साली IITS (Indian Institutes of Technology) एकूण जागा ८२९५ होत्या आणि त्यासाठी एकूण ३ लाख ८४ हजार अर्ज आले होते. त्यामुळे भारतातील अशा शैक्षणिक संस्थांमध्ये प्रवेश न मिळाल्यामुळे हजारो भारतीय विद्यार्थी परदेशात या शिक्षणासाठी जात आहेत. सन २००८ मध्ये एकट्या अमेरिकेतील भारतीय विद्यार्थ्यांची संख्या ९४,५६३ इतकी होती. अमेरिकेतील एकूण परदेशी विद्यार्थ्यांची संख्या त्या वेळी (२००८) ६ लाख २३ हजार इतकी होती. सिंगापूरसारख्या अगदी छोट्या देशातील परदेशी विद्यार्थ्यांची संख्या दीड लाख इतकी आहे. या तुलनेत भारतातील परदेशी विद्यार्थ्यांची एकूण संख्या (जी १० वर्षांपूर्वी नगण्य होती) आता २७,००० पर्यंत कशीबशी पोचली आहे. आज अमेरिकेतील भारतीय विद्यार्थ्यांची संख्या एक लाखापेक्षा जास्त आहे. प्रत्येक विद्यार्थ्याचा तेथील दरवर्षाचा खर्च, २०१० मध्ये, शिक्षणक्रमानुसार, १२ ते १५ लाख रुपये इतका होता. त्या वेळी डॉलरचा विनिमय दर एका डॉलरला सुमारे ५२ रुपयांच्या आसपास असे. आज हा विनिमय दर एका डॉलरला ६५ ते ६८ रु. पर्यंत गेला आहे. त्यामुळे हा दरडोई खर्च दरवर्षी २० लाखांपर्यंत जाणे सहज शक्य आहे. याप्रमाणे दरवर्षी भारत ७ ते ७।। बिलियन डॉलर्स (सुमारे ७ ते ७।। अब्ज रुपये) इतकी रक्कम शिक्षणासाठी अमेरिकेला देत आहे. अमेरिकेचा हा शैक्षणिक अर्थकारणाचा आधुनिक साम्राज्यवाद असून याला त्यांच्यापेक्षा आपला शैक्षणिक विकास आणि शैक्षणिक गुणवत्तावृद्धीतील नाकर्तेपणाच जबाबदार आहे.

आपले (भारतीय) विद्यार्थी परदेशात शिक्षणासाठी जातात याची सहा प्रमुख कारणे स्पष्टपणे दिसतात. ती अशी –

१) भारतात IITS/ IIMS आणि वैद्यकीय महाविद्यालयांत प्रवेश मिळत नाही.

२) भारतातील उच्च शिक्षणाचा दर्जा जागतिक तुलनेत खूपच कमी आहे (पहिल्या २०० विद्यापीठांत आपले एकही विद्यापीठ नाही). संशोधनातही भारत जागतिक पातळीवर खूप खालच्या स्तरावर आहे.

३) भारतात संशोधनासाठी सुविधाही नाहीत आणि प्रोत्साहनही नाही.

४) इथे गुणवत्तेला फारशी किंमत नाही.

५) परदेशात नोकरीची हमी असते.

६) परदेशात उच्च शिक्षण आणि नोकरी यांमध्ये राजकीय हस्तक्षेप नसतो.

सन २००७ च्या मानवी कामगार अहवालाप्रमाणे (Human Labour Report) ९०% जागांसाठी रोजगाराच्या क्षेत्रात काही ना काही कृतिशील कौशल्याची (Active skills) गरज असते. पण आपल्या ९०% शिक्षण संस्थांमध्ये केवळ पुस्तकी ज्ञान दिले जाते.

अनुक्रमणिका

कृतिशील कौशल्ये शिकविली जात नाहीत. पुढील ५ ते ७ वर्षांत जगातील रोजगारांत २५% जागा भारतातील तरुणांना उपलब्ध असतील. पण त्यासाठी ३० कोटी उच्चशिक्षित तरुणांना कौशल्यांचे शिक्षण द्यावे लागेल. तसे झाले तर भारतातील त्या वेळचे मार्केट सुमारे २० लाख कोटी रु. चे असेल. हे उद्याचे उच्च शिक्षणाचे मार्केट लक्षात घेऊन भारत सरकारने आता उच्च शिक्षणाचे खासगीकरण करण्याचे नियोजन केले आहे. 'युजीसी'च्या पोवार समितीने Public Private Partnership ची (PPP) चार मॉडेल्स सुचविलेली आहेत.

१) खासगी संस्थांनी पायाभूत सुविधा निर्माण करून द्यावयाच्या आणि त्या संस्थांमधील शैक्षणिक कार्य आणि व्यवस्थापन सरकारने करावयाचे. यात खासगी संस्थांच्या गुंतवणुकीबद्दल त्यांना दरवर्षी सरकारने काही रक्कम द्यावयाची.

२) खासगी संस्थांनी पायाभूत सुविधा निर्माण करावयाच्या आणि त्या संस्थांमधील शैक्षणिक कार्य आणि व्यवस्थापनाचीही जबाबदारी घ्यावयाची. त्यासाठी सरकारने त्या संस्थांना काही विशिष्ट सेवांसाठी दरवर्षी काही रक्कम द्यावयाची.

३) पायाभूत सुविधा आणि गुंतवणूक सरकार आणि खासगी संस्थांनी (दोघांनी) मिळून करावयाची आणि शैक्षणिक कार्य व व्यवस्थापन खासगी संस्थांनी करावयाचे.

४) सरकार पायाभूत सुविधा निर्माण करेल आणि खासगी संस्था शैक्षणिक कार्य आणि व्यवस्थापन यांची जबाबदारी घेईल.

अशा प्रकारच्या सरकारी आणि खासगी संयुक्त प्रकल्पांच्या पद्धतीनुसार (PPP) सरकारने आज २० IITS (भारतीय तंत्रज्ञान संस्था) आणि १४ नवनिर्माण विद्यापीठे (Innovation Universities) यांची निर्मिती सुरूही केलेली आहे. शिक्षणाची ही पद्धत भारतात रूढ झाली तर खासगी संस्थांना काही ना काही नफा द्यावाच लागेल आणि हे शिक्षणाचे व्यापारीकरणच म्हणावे लागेल.

झपाट्याने वाढणाऱ्या विद्यार्थिसंख्येप्रमाणे त्यांना हवे ते शिक्षण, नवनवीन संस्था उभ्या करून, त्यांना परवडेल अशा शुल्कात देणे आजतरी सरकारला अशक्य आहे. म्हणूनच शिक्षणाचे खाजगीकरण (Privatization) करण्याचा मार्ग सरकारने स्वीकारून त्याची अंमलबजावणी यापूर्वीच सुरू केलेली आहे. शिक्षणाच्या व्यापारीकरणाला आता परदेशी विद्यापीठांचे आगमन हातभार लावणार आहे. ही परदेशी विद्यापीठे केवळ भारतीय विद्यार्थ्यांच्या कल्याणासाठी इकडे येत नसून यातून नफा कमावण्यासाठीच ती इकडे येणार, यात कोणी शंका घेण्याचे काहीही कारण नाही. आपण परदेशी नामवंत शिक्षण संस्थांप्रमाणे जागतिक दर्जाचे उत्तम शिक्षण आपल्या विद्यार्थ्यांना इथे देऊ शकत नाही आणि त्यामुळेच परदेशी विद्यापीठांचे शोषणावर आधारित असणारे ओझे आपण आपल्या डोक्यावर घेत आहोत.

खासगी संस्थांच्या शिक्षणाच्या व्यापारीकरणाला सर्वोच्च न्यायालयानेही हिरवा कंदील दाखविलेला आहे. उन्नीकृष्णन विरुद्ध राज्य सरकार या खटल्याचा निकाल या संदर्भात महत्त्वाचा आहे. अशा अनेक खटल्यांमध्ये विनाअनुदानित खासगी शिक्षणसंस्थांना त्यांच्या एकूण खर्चाच्या प्रमाणात माफक शुल्क आकारण्याचा अधिकार आहे, हे न्यायालयांनी अनेकदा स्पष्ट केलेले आहे.

उच्च शिक्षणाचे पाच महत्त्वाचे प्रश्न पुढीलप्रमाणे निश्चित करता येतील –

१) आर्थिक मागासलेल्यांना गुणवत्तापूर्ण उच्च शिक्षण कसे देता येईल?

२) समाजातील सर्व थरांतील युवक उच्च शिक्षणात कसे येतील?

३) उच्च शिक्षणाची गुणवत्ता कशी वाढेल? आणि महत्त्वाचे म्हणजे समान गुणवत्तेचे शिक्षण सर्वांना कसे देता येईल?

४) उच्च शिक्षणातील संशोधन वृद्धिंगत होऊन ते देशाच्या विकासासाठी कसे उपयोगात आणता येईल?

५) ज्ञानाधिष्ठित जागतिक समाजरचनेत भारताचे (उच्च शिक्षणाच्या द्वारे) योगदान आणि महत्त्व काय असेल? काय असले पाहिजे?

आता कुठे आपल्याला या प्रश्नांची जाणीव होऊ लागली आहे. १२ व्या पंचवार्षिक योजनेत या दृष्टीने भरीव तरतूद करण्याचा सरकारचा मानस आजच्या मंदीच्या आणि रुपयाच्या घसरणीच्या संदर्भात कसा पूर्ण होईल,








याची चिंता आज आपल्याला लागून राहिली आहे. अशा कठीण परिस्थितीत शिक्षणाचे खासगीकरण आणि व्यापारीकरण थोपविणे ही गोष्ट वाटती तितकी सोपी नाही आणि सरकारला केवळ दोष देऊन यातून मार्ग सापडणेही शक्य नाही.

अशा प्रकारे बालवाडीपासून उच्च शिक्षण व संशोधनापर्यंतच्या शिक्षणाचा धावता आढावा घेतला, तर जिथे सरकारी अनुदान आहे तिथे गुणवत्ता नाही आणि जिथे गुणवत्ता आहे तिथे सरकारी अनुदान नाही, अशी आजची स्थिती आहे. तसेच ज्या खासगी शिक्षण संस्था गुणवत्तापूर्ण शिक्षण देतात तिथे शिक्षणाचे व्यापारीकरण होताना दिसते आणि जिथे शिक्षणसंस्था सरकारी अनुदानावर चालतात तिथे उत्तरदायित्व (Accountability) फारसे स्पष्ट नसते आणि ते शिक्षण तुलेनेने स्वस्तात मिळते; पण ते शिक्षण सर्वसामान्यपणे कमी गुणवत्तेचे असते, असे चित्र दिसते. याला अर्थातच अपवाद आहेत. पण सर्वसामान्य अनुभव असाच आहे.

एकविसाव्या शतकाची सुरुवात अमेरिकी भांडवलशाहीप्रणीत जागतिकीकरण, दहशतवाद, खुल्या बाजारपेठांची सवंग जाहिरातबाजी, अनियंत्रित बाजाराचा उन्माद, राजकारणाचे गुन्हेगारीकरण यांनी झाली. 'मूल्य' आणि 'किंमत' यांतील फरक आपण विसरत चाललो. वास्तवाला आवश्यक असणारा नैतिक तत्त्वज्ञानाचा आधार तुटत चालला. उच्च शिक्षणातून जीवनमूल्यांचे संस्कार गेल्या ५० वर्षांत हळूहळू नष्ट होत चालले. भारतीय जीवनमूल्ये आणि नव्या जागतिकीकरणाची बाजारमूल्ये यांच्या संघर्षाचा हा काळ आहे. अशा परिस्थितीत देशाच्या शिक्षण व्यवस्थेत आमूलाग्र बदल वेगाने घडत आहेत. हे बदल नैतिक मूल्यांना शक्ती देणारे ठरावेत, यासाठी सर्वांनी 'सजग' राहणे आवश्यक आहे.

ঙঙঙ

---












पुस्तक परीक्षण :

# महाभारत कालगणनेतील षड्यंत्र

श्री. मा. भावे

माझे परिचित श्री. हरगोविंद म. होले यांनी 'महाभारत कालगणनेतील षड्यंत्र' हे पुस्तक लिहून एका चिरंतन प्रश्नाला हात घातला आहे. महाभारतातील कौरव-पांडवांचे युद्ध नेमके केव्हा झाले, हा तो प्रश्न होय. काही अभ्यासक असे सांगतात की, महाभारताकडे केवळ एक काव्य म्हणून पाहावे; कोणत्याही ऐतिहासिक घडामोडीचे चित्रण महाभारतात आले आहे, असे समजू नये. हेच मूलतत्त्व धरून चालले की, युद्ध केव्हा झाले, युद्ध ज्यांच्यात झाले ते कौरव-पांडव कुठे व केव्हा होते, महाभारतात वर्णिलेली चातुर्वर्ण्यात्मक समाजरचना होती की नाही, वर्ण जन्माच्या आधाराने ठरत होता की गुण-कर्माच्या योगाने ठरत असे, या महाकाव्यातील कविकल्पना कोणत्या व वास्तव कोणते, युद्धात वापरलेली अस्त्रे प्रत्यक्षात होती की नाही, असे नाना प्रश्न बाजूला पडतात व काव्याशी संबंधित असे प्रश्न तेवढेच उरतात. मग व्यक्तींची स्वभावचित्रे, झाल्या प्रसंगांचे वर्णन, त्या वर्णनातील खाचाखोचा, महाभारतात आलेले तत्त्वज्ञान यांचा विचार पुढे येतो.

पण आपण असे मानले की, महाभारत हे घडलेल्या गोष्टींची हकिकत सांगते आहे, तर पहिला प्रश्न हाच येतो की, हे प्रसंग केव्हा झाले? या घडामोडी कधी झाल्या? याचा विचार करू लागले की, आपल्याला महाभारताच्या अंतर्गत पुराव्यांचा आणि बहिःस्थ पुराव्यांचा विचार करावा लागतो. अंतस्थ पुरावे म्हणजे महाभारतात ठिकठिकाणी आलेले काळाचे उल्लेख. यांतला पहिला उल्लेख म्हणजे 'भारतीय युद्ध कलियुगाच्या आरंभी झाले', अशा आशयाचे कृष्णाच्या तोंडचे वाक्य. भीम-दुर्योधन गदायुद्धात दुर्योधन मारला गेला व त्याला भीमाने लाथ मारली. आपल्या दोघा शिष्यांची लढत बलराम पाहत होता व भीमाचे निंद्य कृत्य पाहून तो संतप्त झाला. तेव्हा त्याचे समाधान करण्यासाठी कृष्ण म्हणाला, 'प्राप्तं कलियुगं विध्दिं' कलियुग आले आहे, तेव्हा असे व्हावयाचेच. महाभारतात आणखीही दोन ठिकाणी कलियुग जवळ आल्याचा उल्लेख आहे.

आता कलियुग केव्हा सुरू झाले, हा नवा प्रश्न पुढे आला,. त्याला उत्तर असे की, भारतीय ज्योतिषशास्त्राने कलियुगाचा आरंभकाल, आताच्या भाषेत, इ. स. पू. ३१०१ असा ठरविला आहे. ज्योतिषशास्त्राने तरी हा काल कसा ठरविला? कलियुगाच्या आरंभी सूर्य, चंद्र, बुध, शुक्र, मंगळ, गुरू व शनी हे सर्व ग्रह अश्विनी नक्षत्रात होते असे मानून अशी ग्रहस्थिती केव्हा होती याचे गणित बसविले व त्या आकडेमोडीनुसार इ. स. पू ३१०१ साली, १७ फेब्रुवारी (गुरुवार) या दिवशी कलियुगाचा प्रारंभ झाला, असे निश्चित केले. अर्थात, कलियुगाच्या प्रारंभी अशी ग्रहस्थिती होती, ही एक समजूतच आहे. पण तिला परंपरेचा आधार आहे.

महाभारताचा (म्हणजे महाभारतातील घटनांचा) काल सांगणारा दुसरा अंतर्गत पुरावा (भारताचार्य ) चि. वि. वैद्य यांनी उघडकीस आणला. बहुतेकांना हे माहीतच असेल की, पांडवांचा (अनु ) द्यूतात पराभव झाल्यावर, त्या द्यूताच्या अटीप्रमाणे पांडवांवर बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगण्याची आपत्ती आली. त्यानंतर अज्ञातवासातून प्रकट होऊन त्यांनी दुर्योधनाकडे आपले राज्य मागितले. त्या वेळी दुर्योधनाने असा दावा केला की, पांडवांनी अज्ञातवासाचे वर्ष पुरे केलेले नाही; त्यांनी अट मोडली; सबब, त्यांनी पुनः वनवासात गेले पाहिजे. हा तंटा भीष्मांकडे गेला तेव्हा त्यांनी निवाडा दिला की, 'सौर मानाने १३ वर्षे पूर्ण झाली नाहीत; पण चांद्रमानाने १३ वर्षे झाली आहेत.' हा प्रसंग वर्णन करून वैद्य सांगतात की, दुर्योधनादी कौरव सौर वर्ष मानणारे असून पांडव चांद्रवर्ष मानत होते असे गृहीत धरल्याखेरीज कौरव-पांडवांतील भांडणाचा खुलासा होत नाही.

त्यानंतर वैद्य सांगतात की, तैत्तिरीय संहितेतील आणि शतपथ-ब्राह्मणातील उल्लेखावरून असे दिसते,

की त्या काळी बारा चांद्रमासांचे एक वर्ष मानणारे लोक होते; आणि वेदांग ज्योतिषाच्या काळात दर अडीच वर्षांनी एक अधिक मास धरून चांद्रवर्ष व सौरवर्ष यांचा मेळ घालण्याची व्यवस्था होती. या पुराव्यावरून वैद्य असा निष्कर्ष काढतात की, तैत्तिरीय संहिता व ब्राह्मणकाळात दर पाच चांद्रवर्षांनंतर दोन अधिक चांद्रमास धरून चांद्रवर्ष व सौरवर्ष यांचा मेळ घालण्यात येत असावा. हाच नियम सांगून भीष्मांनी असे म्हटले होते की, वनवास व अज्ञातवासाची तेरा वर्षे पांडवांनी पुरी केली आहेत. सारांश, शतपथ ब्राह्मणाचा काळ हा भारतीय युद्धाचा काळ ठरतो. साहजिकच प्रश्न असा येतो की, शतपथ ब्राह्मण केव्हा रचले गेले? शतपथ-ब्राह्मणात असा उल्लेख आहे की, "कृत्तिका थेट पूर्वेस उगवतात." नेमक्या प्राचीबिंदूवर कृत्तिका उगवण्याचा काल कोणता हे गणिताने काढता येते व तो काळ इ. स. पू. २९९० इतका येतो.

थोडक्यात, कलियुगाच्या प्रारंभाचा पुरावा घेऊन तर्क लढवा किंवा चांद्रवर्षाची प्रथा महाभारतकाळी होती हे स्वीकारून विचार करा; निष्कर्ष हाच निघतो की, भारतीय युद्धाचा काळ इ. स. पू. ३००० वर्षे इतका दूरचा असला पाहिजे.

(१)

महाभारताच्या कालनिर्णयाच्या संबंधात आपण आतापर्यंत महाभारताच्या अंतर्गत काय प्रमाणे मिळतात, त्यांचा विचार केला. ही प्रमाणे तपासत असतानाच आपणास महाभारताच्या बाहेर असणाऱ्या काही पुराव्यांचा –उदा., भारतीय ज्योतिषशास्त्र व शतपथ ब्राह्मण– आधार घ्यावा लागलाच. आता आपण महाभारताचा काळ महाभारतबाह्य अशा पुराव्यावरून ठरविण्याचा जो प्रयत्न, मुख्यतः युरोपीय अभ्यासकांनी केला, त्याचा आढावा घेऊ. श्री. होले यांच्या पुस्तकाचा भरही मुख्यतः या युरोपीय लोकांच्या अभ्यासावरच असून तो अभ्यास किती कच्चा आहे, हे दाखविण्यावर श्री. होले यांचा कटाक्ष आहे. हा पुरावा दोन प्रकारचा आहे. पहिला भाग असा की, ग्रीक राजा सेल्युकस निकेटर याचा वकील मेगॅस्थिनिस हा मगधच्या राजाच्या पदरी आला होता. मगधच्या समकालीन राजाचे नाव मेगॅस्थिनिस 'सॅण्ड्रोकोट्स्' असे देतो. मेगॅस्थिनिसने लिहिले आहे की, 'सॅण्ड्रोकोट्स्' व 'डायानिसॉस' यांच्या दरम्यान १५३ पिढ्या झाल्या व त्या दरम्यान ६०४२ वर्षे गेली. डायानिसॉसपासून हिराक्लिजपर्यंत १५ पिढ्या (अलीकडे) झाल्या. मेगॅस्थिनिसने असेही म्हटले आहे की, "हिराक्लिजची भक्ती शौरसेनी लोक करतात व त्याचे मुख्य शहर मथुरा आहे." पुराव्याचा दुसरा भाग म्हणजे भारतातील निरनिराळ्या राजवंशांच्या वंशावळी व त्या वंशाच्या कारकिर्दीचे कालखंड वायुपुराण, विष्णुपुराण, भविष्यपुराण व कल्हणाचे 'राजतरंगिणी' हे काव्य यांतून दिले आहेत, ते या दोन प्रकारांच्या उल्लेखावरून. युरोपीय इतिहासकारांनी अशी कल्पना बसविली की, 'सॅण्ड्रोकोट्स्' म्हणजे चंद्रगुप्त मौर्य. याच्या काळी अलेक्झांडरने हिंदुस्थानावर स्वारी केली व त्या स्वारीचा काळ इ. स. पू. ३१२ हा ग्रीक इतिहासावरून स्पष्ट आहे. हिराक्लिज म्हणजे श्रीकृष्ण हेही मेगॅस्थिनिसच्या सांगण्यावरून स्पष्ट आहे. याचा अर्थ असा की, श्रीकृष्ण ते चंद्रगुप्त या काळात १५३–१५ = १३८ पिढ्या गेल्या. दर पिढीला सरासरीने वीस वर्षांचा काळ धरल्यास श्रीकृष्णापासून चंद्रगुप्तापर्यंत २७६० वर्षे जातात. म्हणजे श्रीकृष्णाचा काळ इ. स. पू. २७६० + ३१२ = ३०७२ इतका ठरतो. भारताचार्य वैद्यांनीही ही मांडणी मान्य केली आहे. कारण, त्यांनी जो भारतीय युद्धाचा काळ इ. स. पू. ३१०१ धरला आहे, त्याच्याशी या युक्तिवादाचा निष्कर्ष जुळतो.

तथापि, या युक्तिवादात पुष्कळच दोष आहेत. पहिली गोष्ट अशी की, सॅण्ड्रोकोट्स् म्हणजे चंद्रगुप्त मौर्य हा जो कयास विल्यम जोन्स (१७४६–१७९४) याने मांडला, यास कोणताच आधार नाही. दुसरे असे की, कृष्णापासून चंद्रगुप्तापर्यंत २७६० वर्षे झाली, असा हिशेब युरोपीय अभ्यासक (व भारताचार्य वैद्य ) बसवितात खरे; पण विष्णुपुराणात असे स्पष्ट म्हटले आहे की, परीक्षितापासून (म्हणजे पांडवांच्या नातवापासून ) नंदास अभिषेक होईपर्यंत १०१५ वर्षे गेली. विष्णुपुराणात असेही म्हटले आहे की, जरासंधाच्या वंशाने मगध देशावर १००० वर्षे राज्य केले व त्या काळात (जरासंधाच्या वंशाचे) २४ राजे झाले. नंतर प्रद्योत वंशाच्या पाच







राजांनी १३८ वर्षे राज्य केले. पुढे शैशुनाग वंश राज्यावर आला व त्यातील १० राजांनी ३६२ वर्षे राज्य केले. नंतर नंदराजे मगधाच्या राज्यावर आले. अशा रीतीने जरासंधापासून नंदापर्यंत १५०० वर्षे गेली व तेवढ्या काळात ३९ राजे आले. सारांश, मेगॅस्थिनिसने दिलेली माहिती आणि विष्णुपुराणावरून मिळणारी माहिती यांत फारच तफावत आहे.

(२)

श्री. होले यांना महाभारतीय युद्धाचा काळ इ. स. पू. ३१०१ हा मान्य आहे. पण तेथपासून पुढच्या इतिहासाची जी मांडणी विल्यम जोन्स व त्याच्या मागोमाग जाणारे युरोपीय इतिहासकार यांनी केली, ती त्यांना अजिबात मान्य नाही. श्री. होले यांनी पुराणात दिलेल्या वंशावळींवर पूर्ण भिस्त ठेवली आहे व भविष्यपुराणातील हकिकती ग्राह्य मानल्या आहेत. भविष्यपुराणानुसार भारताचा इतिहास कसा दिसतो, याचे श्री. होले यांनी केलेले विवेचन पाहू.

महाभारत काळापासून १३०६ वर्षांपर्यंत (म्हणजे इ. स. पू. १७९६ पर्यंत) ४२ पिढ्या मगधातील राजवंशाच्या झाल्या. त्या भविष्यपुराणात दिल्या आहेत. इ. स. पू. १७९६ मध्ये शिशुनाग हा राजा (व त्याचा वंश) मगधच्या राज्यावर आला. इंग्रज इतिहासकार सांगतात की, शिशुनाग वंश इ. स. पू. ६४२ मध्ये मगधच्या सिंहासनावर आला. तेव्हा इंग्रज इतिहासकार व भविष्यपुराण यांच्या कालगणनेत ११५४ वर्षांचा फरक पडतो (पान १२१). शिशुनागवंशाच्या स्थापनेपासून १९३ वर्षांनी (इ. स. पू १६०३) अजातशत्रू हा राज्यावर आला. या अजातशत्रूच्या काळात पर्शियन सत्तेने भारतावर आक्रमण केले, असे युरोपीय इतिहासकार मानतात; पण कोणत्याही पुराणाने या आक्रमणाचा उल्लेख केलेला नाही. पुराणात भारतावर झालेल्या परकी आक्रमणाचा उल्लेख येतो, तो इ. स. पू.५४७ सालातला. ही परकी राजवट मगधावर १०६ वर्षे चालू होती, हेही पुराणात सांगितले आहे.

भविष्यपुराणात भगवान बुद्धाच्या परिनिर्वाणाचा उल्लेख थोड्या अप्रत्यक्ष पद्धतीने आला आहे. भविष्यपुराण सांगते की, पृथ्वीराज चौहान व महम्मद घोरी यांचे युद्ध झाले, तेव्हा भगवान बुद्धाच्या परिनिर्वाणाला २७०० वर्षे झाली होती. पृथ्वीराज चौहान व घोरी यांची लढाई इ. स. पू. ११९३ मध्ये झाली. म्हणजे भगवान बुद्धाचे परिनिर्वाण इ. स. पू. १५०७ या वर्षी झाले. भविष्यपुराणात दिलेल्या बुद्धाच्या काळाला फा-हि-यान या बुद्ध-भिक्षूच्या लिखाणतून दुजोरा मिळतो. फा-हि-यान सांगतो, की तो सिलोनमध्ये (आत्ताची श्रीलंका) असताना (इ. स. पू. १४८) त्याने बुद्धाचा १४९७ वा परिनिर्वाणदिन साजरा केला. म्हणजे फा-हि-यानच्या सांगण्याप्रमाणे बुद्धाचा काळ इ. स. पू. (१४९७ + १४८) १६४५ इतका येतो. युरोपीय इतिहासकार बुद्धाचा काळ इ. स. पू. ५६३-४८३ असा देतात. यावरून असे दिसून येते की, युरोपियन इतिहासकारांनी बुद्धाचा काळच सुमारे १००० वर्षांनी पुढे ओढला आहे (१३९). शिशुनाग वंशातील राजा अजातशत्रू याच्या काळात भगवान बुद्ध होऊन गेले.

श्री. होले यांनी भविष्यपुराणाच्या आधाराने महत्त्वाचा मुद्दा मांडला आहे तो असा की, बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर ३११ वर्षांनी चंद्रगुप्त मौर्याचा नातू अशोक हा राज्यावर आला. याचा अर्थ तो इ. स. पू. ११९६ या वर्षी राज्यावर आला (१५६). राज्यावर येण्यापूर्वीच अशोक बौद्ध-धर्मीय झाला होता. भविष्यपुराणात सांगितलेल्या या हकिकतीला सिलोनमधील बौद्धग्रंथ 'महावंश' यातील उल्लेखांचाही पाठिंबा मिळतो (१५८). यावरून हे स्पष्ट आहे की, चंद्रगुप्त मौर्याचा काळ, सुमारे, इ. स. पू. १३०० इतका तरी असला पाहिजे.

हे खरे असेल, तर विल्यम जोन्स जे सांगतो की, मेगॅस्थिनिस हा ग्रीकांचा वकील होता व तो चंद्रगुप्त मौर्याच्या पदरी होता, त्याची संगती कशी लावायची? मेगॅस्थिनिसचा काळ इ. स. पू. ३०० च्या आसपासचा आहे, हे सर्वमान्य आहे. जोन्सने 'सॅण्ड्रोकोट्स्' म्हणजेच चंद्रगुप्त (मौर्य) मानला यात नक्कीच काहीतरी गफलत झाली असली पाहिजे. आपण हे ध्यानात घेतले पाहिजे की, मेगॅस्थिनिसचे मूळ लिखाण आपल्याला उपलब्ध नाही. त्याच्या ग्रंथातून इतर ग्रीक व लॅटिन ग्रंथकारांनी घेतलेले उतारे काय ते आपल्यापर्यंत आले आहेत. त्यावरून असे दिसते की, ग्रीकांच्या प्राचीन वाङ्‌मयात

अनुक्रमणिका

सांगितलेले पुरुष आणि भारतीय पौराणिक पुरुष यांच्यात मेगॅस्थिनिसने बरीच गल्लत केली आहे. अशा या मेगॅस्थिनिसच्या लिखाणातील 'सॅण्ड्रोकोट्स्' हा राजा म्हणजेच भारतीय इतिहासातील 'चंद्रगुप्त मौर्य' असा जो कयास जोन्सने बसविला, तो खात्रीलायक नव्हे.

(३)

मौर्य राजघराण्याची हकिकत विष्णुपुराणात आली आहे. तीनुसार चंद्रगुप्त मौर्याचा काळ इ. स. पू. १३३४ ते १३०८ असा येतो. म्हणजे बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर २७४ वर्षांनी चंद्रगुप्त मौर्याचे राज्यारोहण झाले. सिलोनच्या बौद्धवाङ्‌मयानुसार भगवान बुद्धानंतर २६२ वर्षांनी चंद्रगुप्त राज्यावर आला. हे दोन्ही काळ एकमेकांशी जुळणारेच आहेत. मौर्यांच्या नंतर मगधात शुंगवंशाचे राज्य आाले. हे घराणे वैदिकधर्माचे होते. पहिला राजा पुष्यमित्र शुंग याने अश्वमेध यज्ञ केला व एका यज्ञात व्याकरणकार पाणिनी हा पुरोहित होता, असा उल्लेख आहे. त्यावरून पाणिनीचा काळ इ. स. पू. १२०० असा ठरतो (२०३). इ. स. पू. १०५० मध्ये शुंग वंशाकडून काण्व वंशाकडे मगधची सत्ता गेली (२०४). काण्वांनंतर सातवाहन घराण्याने इ. स. पू. ५४८ पर्यंत मगधावर राज्य केले, असे श्री. होले विष्णुपुराण व वायुपुराण यांच्या आधाराने सांगतात.

सातवाहनांनंतर कोलिकिलो नावाच्या ठिकाणच्या विंध्यशक्ती नावाच्या राजाने मगधाची सत्ता ताब्यात घेतली. विंध्यशक्तीनंतर त्याचा मुलगा पुरंजम व पुरंजमाचा मुलगा विश्वफानी मगधच्या गादीवर आले, असा उल्लेख वायुपुराणात आहे (२५९).*कोलिकिलो येथील घराणे मगधावर राज्य करीत असताना इराणच्या साम्राज्याची शक्ती वाढत होती. इराणचे सम्राट सायरस (पहिला), दरायस व झेर्झेस यांनी भारतावर आक्रमणे केली आणि इ. स. पू. ४५९ च्या सुमारास मगधच्या राज्यालाही आपले मांडलिक राज्य केले. मगधचे राज्य नंतर १०६ वर्षे इराणी सम्राटांचे मांडलिक म्हणून राहिले.

कोलिकिलो वंशातील भूतनंदी (उर्फ चंद्रगुप्त पहिला) याने इ. स. पू. ३४३ या वर्षी इराणी सम्राटाविरुद्ध बंड केले. त्यापूर्वी ५० वर्षे तो इराण्यांचा मांडलिक म्हणून राज्य करीत होता. इथपासून या कोलिकिलो वंशाने 'गुप्त' हे नाव धारण केले. चंद्रगुप्ताने स्वतः संवत चालू केला. चंद्रगुप्ताचा मुलगा समुद्रगुप्त व त्याचा मुलगा चंद्रगुप्त-विक्रमादित्य हे भारतीय इतिहासात प्रसिद्ध आहेत. श्री. होले सांगतात की समुद्रगुप्ताचा उल्लेख पुराणात शिशुनंदी या नावाने येतो. या समुद्रगुप्ताच्या काळातच ॲलेक्झांडरचे आक्रमण हिंदुस्थानाच्या वायव्य सरहद्दीवर आले. तेथून ॲलेक्झांडर परत फिरला व इ. स. पू. ३२२ मध्ये बगदादला मरण पावला. ॲलेक्झांडरने इराणच्या साम्राज्याचा नाश केला होता व त्या साम्राज्याने हिंदुस्थानाला जोडून असलेले प्रदेश ताब्यात घेतले होते. त्यापैकी काबूल, कंदहार, बख्ख हा भाग ॲलेक्झांडरचा सेनापती सेल्युकस निकेटर याच्याकडे इ. स. पू. ३१२ या वर्षी गेला. त्यानंतर समुद्रगुप्त व सेल्युकस निकेटर यांच्यात अनेक युद्धे झाली. पण दर वेळी सेल्युकस निकेटरचा पराभवच झाला (२८१).

इथे आपण श्री. होले यांनी केलेल्या महत्त्वाच्या दाव्याशी येतो. 'मंजुश्री मूळकस्प' नावाच्या ग्रंथाच्या आधारे ते सांगतात की, 'सॅण्ड्रोकोट्स्' म्हणजे 'चंद्रगुप्त मौर्य' हे विल्यम जोन्सने मांडलेले समीकरण चुकीचे होते. सॅण्ड्रोकोट्स् (किंवा सॅण्ड्रोस्कॉट्स) म्हणजे समुद्रगुप्तच होय (२९२). समुद्रगुप्तानंतर त्याचा मुलगा चंद्रगुप्त (दुसरा) म्हणजेच विक्रमादित्य राज्यावर आला व त्याने इ. स. पू. ३०२ या वर्षी सेल्युकस निकेटरचा पाडाव केला. (३०९)

सारांश, श्री. होले यांच्या प्रतिपादनातील मुख्य मुद्दा हा आहे की, ॲलेक्झांडरचे आक्रमण चंद्रगुप्त मौर्याच्या काळात झाले अशी चुकीची समजूत इंग्रज इतिहासकारांनी करून घेतल्यामुळे त्यांनी लिहिलेल्या प्राचीन भारताच्या इतिहासात फार घोटाळे माजले आहेत. सर्वच इतिहास सुमारे एक हजार वर्षांनी अलीकडे ओढला गेला आहे. पुराणातील वंशावळी व हकिकती लक्षात घेतल्या, तर आपण वर दर्शविल्याप्रमाणे, भगवान बुद्धांचे परिनिर्वाण इ. स. पू. १५०७ साली झाले, असे ठरते. परंतु युरोपीय इतिहासकार परिनिर्वाणाचे वर्ष इ. स. पू. ४८३ असे देतात. म्हणजे इथेच सुमारे १००० वर्षांचे अंतर पडते, हेही आपण पाहिले.

(४)






भारताच्या प्राचीन इतिहासातील घटनांची जी कालगणना आज प्रचलित आहे, तिच्यात अनेक गफलती आहेत व इतिहासाचा व्यवस्थित उलगडा या कालगणनेतून होत नाही, असे प्रतिपादन अनेक अभ्यासकांनी वेळोवेळी केले होते. श्री. होले यांनी या अडचणींचा समग्र विचार प्रस्तुत ग्रंथात केला आहे. आपल्या पुराणांनी दिलेली कालगणना बाजूस का सारायची आणि विल्यम जोन्स व त्याचे युरोपीय अनुयायी यांनी बसविलेली काल्पनिक कालगणना का स्वीकारावयाची, याविषयी अभ्यासकांनी पुनर्विचार केला पाहिजे, असे श्री. होले यांच्या विवेचनावरून मत होते.

पुस्तक याप्रमाणे विचारांना चालना देणारे असले, तरी ते अतिशय बेशिस्त पद्धतीने लिहिलेले आहे, असे खेदपूर्वक म्हणावे लागते. मजकुराची पुनरावृत्ती झालेली आहे; युगाब्द (म्हणजे युधिष्ठिराच्या काळापासून मोजलेले वर्ष) आणि इसवी सनापूर्वीचे वर्ष यांचा मेळ अनेकदा बसत नाही; बऱ्याच ठिकाणी आधार दिलेले नाहीत; मुख्य म्हणजे सूचीही दिलेली नाही. त्यामुळे पुस्तक वाचताना ठेचावर ठेचा लागतात व विवेचनाचा रोख लक्षात येत नाही.

पुस्तकाची छपाई फार गचाळ झाली आहे. पुस्तकात अनेक तक्ते दिले आहेत. तक्त्यांतील नोंदी इतक्या बारीक अक्षरांत आहेत की, त्या वाचता येत नाहीत. बांधणी करताना पानेही पुढे-मागे झाली आहेत. एकंदरीने हे पुस्तक वाचणे हे फारच शीण आणणारे काम आहे. विषयही गहन पण तितकाच रसपूर्ण असल्याने पुस्तक वाचावेसे वाटते. अशी सूचना करावीशी वाटते की, कुण्या तरुण व चलाख अभ्यासकाकडून या पुस्तकाची संपादणी करून घ्यावी.

महाभारत कालगणनेतील षड्यंत्र
लेखक : हरगोविंद महादेवराव होले
प्रकाशक : नभ प्रकाशन, शामनगर,
काँग्रेसनगर रोड, अमरावती.
पृष्ठसंख्या : ४९८,
किंमत : रु. ५००/-.

ଓଓଓ



अनुक्रमणिका

## लेखकांचा परिचय

✠ **प्रा. विश्वनाथ शिंदे**

मराठीचे प्रोफेसर म्हणून शिवाजी विद्यापीठाच्या मराठी विभागात कार्यरत. लोकसाहित्याचे अभ्यासक म्हणून लौकिक. त्यानुषंगाने पंधरा ग्रंथ प्रकाशित. ग्रंथांना महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, दक्षिण महाराष्ट्र साहित्य सभेचे पुरस्कार. विद्यापीठाच्या आणि शासनाच्या समितीचे सदस्य म्हणून सहभाग. कन्नड आणि मराठी लोकसाहित्याचा अभ्यास हे त्यांचे वेगळेपण.

***पत्ता :–*** मराठी विभागप्रमुख, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर – ४१६ ००१.

भ्रमणध्वनी : ९८९०४१८०२८

✠ **श्री. बाबूराव चंदावार**

समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक.

***पत्ता :–*** सईनगर २, डी. १, फ्लॅट-१३, सिंहगडरोड, पुणे-४११ ०३०

दूरध्वनी :०२०-२४२५०६९३ .

✠ **सौ. स्मिता नितीन लाळे**

प्रकाशित साहित्य : 'काव्यदीप' (संपादक : प्रदीप निफाडकर) मासिकात सदरलेखन, तरुण भारत, (बेळगाव), लोकमत या नियतकालिकांत कवितांवरील आस्वादात्मक लेखन, डॉ. द. भि. कुलकर्णी सरांवर 'दभिदर्शन' (कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद) हा गौरवग्रंथ.

***पत्ता :–***डी/३०१, 'वसुधा', डी. एस. के. विश्व, ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे –४११ ०४१.

भ्रमणध्वनी : ८८०५५६४७३९.

✠ **प्राचार्य एच. व्ही. देशपांडे**

निवृत्त प्राचार्य, आजरा महाविद्यालय, आजरा. शिवाजी विद्यापीठाकडून गुणवंत शिक्षक पुरस्कार प्राप्त. एन. एस. एस.च्या कार्यासाठी महाराष्ट्र राज्य पुरस्कार. इंडियन कॉलीजीज फोरम, दिल्ली यांच्या कार्यकारिणीचे सदस्य. इंडियन असोसिएशन फॉर अमेरिकन स्टडीज यांचा शोध-निबंधासाठी राष्ट्रीय पुरस्कार.

***पत्ता :–*** ८२० E, शाहूपुरी, ४थी लेन, कोल्हापूर – ४१६ ००१

दूरध्वनी (०२३१) ६५११५५६. भ्रमणध्वनी : ९८२२७२०४५६.

✠ **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच्. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

***पत्ता :*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४. दूरध्वनी :- (०२०) २५६७४०९३.

---

**नवभारत** ऑक्टोबर २०१३ मधील लेख 'शरद पाटीलकृत शिवकाळ : एक चिकित्सा' हा लेख ग्रंथपरीक्षण असून त्या ग्रंथाबद्दलची माहिती दिली गेली नाही, त्याबद्दल आम्ही दिलगीर आहोत. त्या ग्रंथाची माहिती पुढीलप्रमाणे - शिवाजीच्या हिंदवी स्वराज्याचे खरे शत्रू कोण : महंमदी की ब्राह्मणी?, लेखक : शरद पाटील, प्रकाशक : मावळाई प्रकाशन, पृष्ठे : १५६, आवृत्ती : ४ थी २०१०, मूल्य रु. १३०/-

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.



अनुक्रमणिका

